ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचे दहावे
वार्षिक समारंभाचे वेळीं केलेलें भाषण.

# मराठी वाङ्मयाचा अभ्यास



## कै० हरि नारायण आपटे.

पुणें आर्यभूषण छापखाना.

सन १९२७.

किंमत आठ आणे.

ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचे दहावे
वार्षिक समारंभाचे वेळीं केलेलें भाषण.

# मराठी वाङ्मयाचा अभ्यास.





## कै० हरि नारायण आपटे



आतां विश्वात्मक देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्वस्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।



सन १९२७.



किंमत ८ आणे.



# सूचनापर दोन शब्द.

ता. २८ जून १९०३ रोजीं ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचा दहावा वार्षिक समारंभ झाला ते वेळीं त्या संस्थेच्या व्यवस्थापक मंडळींनीं मला अध्यक्षस्थान दिलें होतें. संस्थेनें असा संप्रदाय पाडला आहे कीं, अध्यक्षानें मराठी वाङ्मयासंबंधाचा कांहीं तरी विषय घेऊन त्यावर भाषण करावें. त्या संप्रदायास अनुसरून मीं 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास' या विषयावर भाषण केलें. यांत इंग्रजी राज्याच्या पूर्वीपर्यंतच्या वाङ्मयाबद्दल मात्र मी बोललों. त्याच्या पुढील वाङ्मयाचा उल्लेख करावयाचा माझा हेतु नाहीं असें मीं प्रारंभींच सांगितलें. तें व्याख्यान लिहून काढून छापावें अशी सूचना माझ्या बऱ्याच मित्रमंडळीकडून आली, तेव्हां व्याख्यान दिलें त्या वेळच्या टिपणांवरून तें जरा अधिक विस्तृतपणें लिहून काढून **ज्ञानप्रकाश** पत्रांत भागशः प्रसिद्ध केलें आणि आतां तें पुस्तकरूपानें काढलें आहे. यांतील महानुभाव ग्रंथांची माहिती मला कृष्णभक्तिपरायण संन्याशी **भास्करभाऊ** महानुभाव यांनीं दिली, त्याजबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें; यांचेकडून महानुभव श्री **कवीश्वर** यांचा भागवत एकादशस्कंध मिळाला आहे, तो लवकरच मी प्रसिद्ध करणार आहें.

पृष्ठ १० वर महानुभावांच्या **लीलाचरित्र**ग्रंथाचें परिशिष्ट निरुक्त म्हणून आहे; तो शब्दकोश असें मीं लिहिलें आहे ती चूक आहे. त्या निरुक्तांत महानुभाव पंथास साधक अशा श्रुत्यादि वचनांचा संग्रह व विवेचन आहे, असें कळतें. तथापि जुन्या भाषेंतील शब्दांचे कोश महानुभावांच्या वाङ्मयांत "टीप" या नांवानें उपलब्ध आहेतच.

या व्याख्यानांत मी अगदीं सुप्रसिद्ध अशा ग्रंथकारांचा मात्र उल्लेख केला. अर्थात्च कित्येक कवींचा नामनिर्देशही करतां आला नाहीं. व्याख्यानांत नवीन असें कांहा नाहीं हें मी जाणून आहें परंतु जुन्या ज्ञानाची पुनरावृत्ति करणें हेंही पुष्कळ प्रकारें श्रेयस्करच आहे, असें जाणून मीं व्याख्यान दिलें. रा. राजवाडे, ठाण्याचे रा. भावे, व रा. पांगारकर इत्यादि विद्वान् लेखक व शोधक नवीन शोध करीतच आहेत व त्यांच्या शोधांमुळें पुष्कळ नवे ग्रंथ व ग्रंथकार आजपर्यंत माहित नव्हते तेही माहित होत आहेत हें मोठें सुचिन्ह आहे. रा. भावे यांनीं 'महाराष्ट्र कवि' नांवाचें मासिकपुस्तक प्रसिद्ध करण्यास आरंभ केला आहे. राजवाडे व पांगारकर यांचे शोध सतत चालू असून, त्यांचे तत्संबंधीं लेखही नेहमीं प्रसिद्ध होत आहेत.

**हरि नारायण आपटे.**

# प्रकाशकाचे दोन शब्द.



या पुस्तकाची ही तिसरी आवृत्ती आज निघत आहे. कै. हरिभाऊंनीं आपल्या सर्व पुस्तकांची, लेखांची व व्याख्यानांची हर तऱ्हेची मालकी **आर्यभूषण छापखान्यास** दिलेली आहे. गेल्या सालीं छापखान्यावर गुदरलेल्या प्रसंगामुळें हरिभाऊंची वाङ्मयसंपत्ति सर्व अग्निनारायणाचे मुखीं पडली व त्यामुळें ती तूर्त दुर्मिळ झाली आहे. सदर पुस्तकें क्रमशः छापण्याची व्यवस्था छापखान्याचे सोईप्रमाणें चालू आहे व हल्लींची अडचण लवकरच पूर्णपणें दूर होईल अशी आशा आहे. मराठी भाषेचा अभ्यास करणारास या पुस्तकाचा फार उपयोग आहे, म्हणून हें पुस्तक तांतडीनें प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

आर्यभूषण प्रेस, पुणें.
२५ मार्च. १९२७ प्रकाशक.

पहिली आवृत्ती—१९०३.
दुसरी आवृत्ती— १९२१.
तिसरी आवृत्ती—१९२७.

# मराठी वाङ्मयाचा अभ्यास.



आज दहा वर्षेपर्यंत या मराठी ग्रंथसंग्रहालयाची पुरस्कर्ती मंडळी दरसाल आजच्या सारखा समारंभ करून, कोणा तरी मराठी भाषेचा अभिमान बाळगणाऱ्या गृहस्थास आमंत्रण करून व त्यास पौरोहित्य देऊन एक प्रकारचा वाग्यज्ञ करविते, ही गोष्ट फार अभिनंदनीय होय अशा तऱ्हेचा वाग्यज्ञ दरसालास एकवार झाल्यानें अनेक प्रकारचे लाभ होतात यांत शंका नाहीं. एक तर आपल्या वाङ्मयाच्या पुनरुज्जीवनाकरितां व अभिवृद्धीकरितां कोण कोण, काय काय व कशा कशा प्रकारचे प्रयत्न करीत असतात याचें सिंहावलोकन होऊन, विविध विषयांची चर्चा करण्यास हे प्रसंग चांगले उपयोगीं पडतात. दुसरें असें कीं, यदाकदाचित् नवीन माहिती कांहीं लाभली नाहीं, तरी पूर्वीच्या ज्ञानाचा सालांतून एकदां साररूपानें पुनरुच्चार झाला तरीही तो श्रेयस्करच होतो. माझ्यापूर्वीं नऊ वर्षेपर्यंत जे हे वार्षिक वाग्यज्ञ झाले, त्यांत कित्येक फार थोर असे पुरोहित झाले. तेव्हां त्यांची योग्यता आपल्या अंगीं नसून आपण त्याच पीठावर आरूढ व्हावें हें प्रथमतः मला योग्य वाटलें नाहीं. परंतु कोणी मनोभावानें आपला आदर करीत असतां, तो आदर न स्वीकारणें म्हणजे आमंत्रण करणाराचा विनाकारण अनादरच करणें होय असें मनांत आणून रा. भावे यांनीं मला दिलेलें आमंत्रण मीं स्वीकारलें. तेव्हां माझा आदरपूर्वक अंगीकार आपण केला त्याप्रमाणेंच प्रस्तुत कार्यांत माझ्या अयोग्यपणामुळें जें कांहीं उणें पडेल तें ध्यानीं न आणतां शेवटपर्यंत माझे हातून कार्य शेवटास न्यावें असें ज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रासादिक वाणीनें आपणांस विनवून आपल्या कार्यास लागूं

**जैसा स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ॥**
**तरी अधिक तयाचा । संतोष आथी ॥ ५ ॥**
**तैसा तुम्ही मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला ॥**
**तरी उणें सहजें उपसाहलां । प्रार्थूं काई ॥ ६ ॥**

मीं संग्रहालय पाहिलें, संग्रहालयाचा हेतु फार स्तुत्य आहे व जितका हेतु स्तुत्य आहे तितकाच त्याच्या पुरस्तस्कर्त्यांचा प्रयत्नही पण स्तुत्य व मनःपूर्वक चालला आहे. अशा प्रयत्नास यश हें आलेंच पाहिजे. आणि तें हळूं हळूं येत आहे अशाबद्दल सुचिन्हेंच दिसत आहेत. दरसाल पुस्तकांचा संग्रह तर वाढत चाल

लाच आहे आणि वर्गणीदारांची संख्याही वाढत आहे. तथापि ही अभिवृद्धि ज्या वेगानें व्हावयास पाहिजे, त्या वेगानें होत नाहीं ही खरोखरच मोठी शोचनीय गोष्ट आहे. असें होण्याचें कारण अर्थातच द्रव्यसाहाय्याचा अभाव हें होय. या संग्रहालयाच्या चालकांच्या मनांतून संग्रहालयांत अद्यापि अप्रसिद्ध अशा मराठी ग्रंथांच्या हस्तलिखित ग्रंथांचाही संग्रह करावयाचा आहे व तसा त्यांनीं प्रयत्न करून बऱ्याच नवीन ग्रंथांचा संग्रह केलाही आहे. परंतु जोंपर्यंत संग्रहालयाला स्वतःचें मंदिर–अग्नीपासून निर्भय असें मंदिर–नाहीं, तोंपर्यंत संस्थेला चिरस्थायित्व आलें असें म्हणतां येणार नाहीं. असें मंदिर उठविण्यास द्रव्यसाहाय्य पाहिजे. तें प्रयास करूनही मिळत नाहीं याबद्दल खेद वाटतो, परंतु आश्चर्य मात्र वाटण्याचें कारण नाहीं; कांकीं, श्री आणि सरस्वती यांचा सलोखा होऊन श्रीनें सरस्वतीच्या अभिवृद्ध्यर्थ आपल्यास झीज सोसली आहे असें फारच क्वचित् होतें. तथापि निराश होऊन आपण प्रयत्न मात्र सोडतां कामा नये. आज नाहीं उद्यां कोणी धर्मात्मा **कार्नेजी** उभा राहील आणि या 'संग्रहालयाला' सरस्वतीचें विशाल मंदिर बनवील.

## पुस्तकसंग्रहालयें.

हीं संग्रहालयें करण्याची बुद्धि आपणांस कां होते ? थोडासा विचार केला असतां आपल्यास असें दिसून येईल कीं, आपलें स्वतःचें, आपल्या कुटुंबाचें, आपल्या ग्रामाचें, आपल्या प्रांताचें, आपल्या देशाचें, किंबहुना समग्र मनुष्यजातीचें संरक्षण व्हावें ही प्रत्येक मनुष्याची उत्कट इच्छा असते, स्वसंरक्षण करून वंशवृद्धि करावी याबद्दल जशी मनुष्याला उपजतबुद्धि असते, त्याप्रमाणेंच आपल्या पूर्वजांनीं संचित केलेलें ज्ञान जतन करून ठेवून त्यांत भर घालावी हीही पण मनुष्याच्या उपजतबुद्धीपैकींच एक बुद्धि होय. एकदां अनुभवानें किंवा अंतःस्फूर्तीनें प्राप्त झालेलें ज्ञान आपल्यालाच पुनः उपयोगीं पडावें म्हणून किंवा आपल्या जवळ चिरकाल राहून आपल्या पुढच्या पिढ्यानुपिढीच्या लोकांस त्याचा उपयोग व्हावा म्हणून त्याचा संचय करण्याची इच्छा होणें मनुष्यास अगदीं नैसर्गिक आहे. कोणत्याही देशांत पाहिलें तरी पित्यापासून पुत्राला व गुरूपासून शिष्याला याच इच्छेनें ज्ञानोपदेश केला जातो. प्राचीनकाळीं लेखनकला नसल्याकारणानें वाक्‌परंपरेनेंच अशा ज्ञानास चिरस्थायी केलें जात असे. हा जो ज्ञानसंचय तो अबाधित रहावा व त्याचा उपयोग सर्वांस सहज करतां यावा या अत्युत्कट इच्छेचें फल लेखनकला होय. लेखन अस्तित्वांत आल्याबरोबर अर्थातच केवळ वाक्परंपरेनेंच गुरूपासून शिष्यास ज्ञान मिळण्याच्या ऐवजीं, केव्हां केव्हां पुस्तकांचा उपयोग होऊं लागला. ज्या ठिकाणीं लेखनोपयोगी द्रव्यें मिळणें कठिण नव्हतें, त्या ठिकाणीं त्या द्रव्यांवर म्हणजे भूर्जपत्र, ताडपत्र, वगैरेंवर ग्रंथ

तयार झाले, परंतु ज्या ठिकाणीं हीं साधनें नव्हतीं, त्या ठिकाणच्या लोकांनी मातीच्या विटा करून त्यावर आपले ग्रंथ लिहून, त्या विटा पुढें भाजून त्यांचा संग्रह करून ठेविला ! असीरिआ, ईजिप्त वगैरे देशांत अशा तऱ्हेचे इष्टकालिखित ग्रंथ थोडया वर्षांपूर्वी सांपडले ! आपलेकडे शिलालेख फार; आणि पुढें कागद निघाल्यानंतर त्यांवर ग्रंथ लिहिले जाऊं लागले. एवंच कोणीकडून तरी मनुष्याची बुद्धि ही कीं, आपल्या पूर्वजांचा व आपल्या काळचा ज्ञानसंचय आपण जतन करून पुढील पिढीस मिळेल असें करावें. हे ग्रंथ प्रारंभीं जगन्नियंत्या परमेश्वराच्या स्तुतिपर किंवा प्रार्थनापर असेच असत आणि त्यामुळें त्यांचा संग्रह, देवालयें, धर्मपीठें व मठ यांतच केला जात असे. अत्यंत प्राचीन कालापासून आमच्या देशांत काशीपासून रामेश्वरापर्यंत व द्वारावतीपासून पुरीपर्यंत चारही धामांत, आठही पुऱ्यांत आणि सर्व क्षेत्रांत जीं विद्यापीठें व मठ आहेत तेथें जुन्या ग्रंथांचे फार उत्तम व अवाढव्य ग्रंथसंग्रह असत. परंतु इतर अनेक दिशांनीं देशाचा ऱ्हास सुरू झाला त्याप्रमाणें विद्येचाही ऱ्हास होऊन या ग्रंथसंग्रहाचा बहुतेक नाश झाला.

दैवाच्या अनुकूलतेनें आज मुद्रणकला इकडे आल्याकारणानें जुन्या ग्रंथांचा उद्धार करणें आम्हांस किती तरी सुसंभाव्य झालें आहे. मुद्रणकला, ही ज्याप्रमाणें अन्य देशांत, त्याचप्रमाणें आमच्याही देशांत प्राचीन विद्येच्या जीर्णोद्धारास कारण झाली. जुने लेख व पुस्तकें शोधण्याची आणि ते सांपडले असतां छापविण्याची उत्कट इच्छा आपणांस होऊं लागली आहे. थोडया वर्षांपूर्वी काव्येतिहाससंग्रह सुरू झाला तेव्हांपासून पुष्कळांची प्रवृत्ति जुन्या ग्रंथांच्या शोधाकडे झाली व तिचें फळ आज असें झालें आहे, कीं जवळ जवळ चार पांच हजार नवीन ग्रंथ—अजून न छापलेला असा सांपडला आहे. ग्रंथसंख्या पाहिली, तर ती एक लाखाच्यावरही जाईल कीं काय कोण जाणें. इतका सगळा ग्रंथसमूह छापून निघणें आपल्या हयातींत जरी झालें नाहीं तरी पुढेंमागें होणें जरूर आहे.

परंतु हल्लीं विद्येच्या पुनरुज्जीवनाचा काल आला आहे. छापण्याची कला निघाल्यामुळें एकाद्या प्राचीन ग्रंथाची एक प्रत मिळाली, तरी तिच्या हजारों प्रती अल्पायासांनीं करून ठेवतां येतात, आणि प्राचीन ग्रंथांचें अध्ययन करण्याची अभिरुचि व अभिमान हीं पुनः जागृत झालीं असल्याकारणानें लोकांत आपल्या ग्रंथाचे संग्रह— सर्व लोकांस उपयोग करतां येईल अशा बेताचे संग्रह— करण्याची इच्छा होऊं लागली आहे. प्राचीन संस्कृत ग्रंथांचा उद्धार करण्याचे हेतूनें कांहीं संग्रह स्थापिले आहेत व अशाप्रमाणें ग्रंथसंग्रह उत्पन्न झाल्यामुळें जुने ग्रंथ छापून प्रसिद्धही होण्यास सुरुवात झाली आहे. ज्याप्रमाणें संस्कृतासंबंधानें त्याचप्रमाणें मराठीसंबंधानेंही प्रयत्न सुरू झाले आहेत. प्रस्तुत ज्या संस्थेच्या

छत्राखाली आपण आज येथें जमलों आहोंत ती संस्था या मराठी ग्रंथांच्या उद्धाराविषयीं व प्रसाराविषयीं जी आम्हां महाराष्ट्रीयांत अत्यंत उत्कट इच्छा जागृत होत आहे तिचेंच फल होय. आज दहा वर्षें या मंडळींनीं जी ही संस्था आपापल्या सामर्थ्यांच्या बाहेर श्रम करून जतन केली व तिची अभिवृद्धि व्हावी म्हणून अजूनही त्यांचे प्रयत्न चालले आहेत, त्याचें कारणही स्वभाषेच्या उद्धाराची व प्रसाराची प्रबळ इच्छाच होय.

## मराठी वाङ्मय.

मराठी भाषेंतील वाङ्मयासंबंधानें कोणीही अभिमानानें बोलूं लागला, त्या वाङ्मयाचा उद्धार, प्रसार व अभिवृद्धि व्हावी असें प्रतिपादूं लागला, कीं कित्ये-कांचा असा आक्षेप निघतोः– " मराठींत उद्धाराला व अभ्यासाला योग्य असें वाङ्मयच नाहीं. " आज माझ्या मनांत याच आक्षेपाचें विवेचन करून त्यावर उत्तर द्यावयाचें आहे. त्याचप्रमाणें त्या उत्तरावरून जर असें ठरलें कीं मराठी वाङ्मय म्हणून कांहीं अभिमान करण्याजोगी वस्तु आहे, तर त्या वस्तूचें संरक्षण करून तिच्यासंबंधीं ज्ञान आम्हीं कसें मिळवावें– म्हणजे मराठी वाङ्मयाचा उद्धार करून त्याचा अभ्यास आम्हीं कसा करावा– हेंही सांगावयाचें आहे.

कोणत्याही आक्षेपांस उत्तर द्यावयाचें तर आक्षेपकाचें व आपलें जुळतें कोठपर्यंत, आणि भेद कोठून सुरू होतो याचा विचार प्रथम केला पाहिजे. सध्यांचा आक्षेपविषय ' मराठी वाङ्मय ' हा आहे. आक्षेपक म्हणतात ' मराठींत नांव घेण्याजोगें वाङ्मय नाहीं.' तेव्हां प्रथम आधीं वाङ्मय या शब्दाचा अर्थ काय हेंच ठरवून घेतलें पाहिजे. वाङ्मय या शब्दाची व्याख्या जर त्यांची व आमची एक जुळली, तर त्या व्याख्येच्या कसोटीस मराठी वाङ्मयाला लावून त्याची तेजी किती रहाते तें पाहिलें म्हणजे वाद अगदीं आटोक्यांत येऊन, काय तो निकाल लावतां येईल. वाङ्मय शब्दाच्या व्याख्येबद्दलच जर वाद पडला तर मग पुढच्या आक्षेपाचें निरसन तरी कसें होणार आणि वादाचा निकाल कसा लागणार ? तेव्हां प्रथमतः आतां आपण ' वाङ्मय ' या शब्दाचा अर्थ काय काय घेतो तें पाहूं. आपण इंग्रजींतील ' Literature ' या शब्दाच्या ऐवजीं नेहमीं ' वाङ्मय ' किंवा ' ' सारस्वत ' या दोन शब्दांची योजना करतों तेव्हां ' Literature ' या शब्दांत जितका अर्थ समाविष्ट होतो, तितका आपल्या ' वाङ्मय ' या शब्दांत होतो असें धरून त्या अर्थानें ज्यास ' वाङ्मय ' असें नांव देता देईल, असा ग्रंथसंग्रह मराठी भाषेंत आहे कीं नाहीं हें आपणांस पहा-वयाचें आहे.

## वाङ्मय म्हणजे काय ?

इंग्रजींतील Literature या शब्दांत काय अर्थ येतो, कोणकोणचा अर्थ समाविष्ट होतो हें पहाण्यापूर्वी आपले प्राचीन ऋषी 'वाङ्मय' शब्दांत कशाकशाचा अंतर्भाव करीत असत हें पाहूं. तें पाहिल्यानंतर युरोपांतील पंडित Literature या शब्दाची काय व्याख्या करितात, तेंहीं पाहूं. आणि दोन्ही शब्दांत अंतर्भूत होणारा अर्थ एकाच योग्यतेचा किंबहुना एकच आहे असें दिसून आलें तर मग त्या अर्थानें ज्याचा निर्देश निश्चितपणें करतां येईल असें वाङ्मय मराठींत आहे कीं नाहीं हें पाहूं.

'वाङ्मय' या शब्दाचा अर्थातच निर्देश करून त्याचें महत्त्व ज्यात दाखविलें आहे, असे उल्लेख उपनिषदांतून कित्येक ठिकाणीं आहेत. परंतु जेथें 'वाक्' शब्दाचा अर्थ स्पष्टपणें सांगून त्याचें महत्व वर्णन केलें आहे असा एक फारच चांगला प्रसंग बृहदारण्योपनिषदांत आहे.

सीतेचा पिता जनकराजा हा फार मोठा पंडित व वैराग्यवान् असे. आपल्याकडे ऋषींना बोलावून किंवा आपण ऋषींकडे जाऊन त्यांच्या समागमांत व निरनिराळ्या गहन विषयांवर वादविवाद करण्यांत त्याला फार आनंद होत असे. एक वेळीं तो आपल्या परिपाठाप्रमाणें महर्षि याज्ञवल्क्य यांजकडे गेला होता. तेव्हां याज्ञवल्क्यांनीं त्यास कुशल विचारून पुढें प्रश्न केला, "राजा, तुझेकडे पुष्कळ विद्वान् लोक येतात, त्यांच्यापैकीं कोणापासून तुला कांहीं नवीन ज्ञान झालें आहे काय ?" तेव्हां राजानें महर्षींस म्हटलें: "महाराज, मजकडे जित्वा शैलिनि नांवाचे एक ऋषि आले होते व वाणीसंबंधानें भाषण सुरू झालें असतां ते म्हणाले: "वाक् म्हणजे ब्रह्मच होय." तें त्यांचें म्हणणें बरोबर आहे कीं नाहीं याविषयीं आपल्या तोंडून काय तें ऐकावें अशी इच्छा आहे." त्यावर वाणीच्या महत्त्वावर त्या दोघां वाग्वीरांचें संभाषण झालें तें सर्वच येथें भाषांतरासह आपणास वाचून दाखवतों म्हणजे "वाङ्मयाची" प्राचीन कल्पना किती उदात्त होती हें आपणास समजून येईल.

### बृहदारण्यांतील उतारा.

यत्ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे जित्वा शैलिनिर्वाग्वै ब्रह्मेति। यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छैलिनिरब्रवीद्वाग्वै ब्रह्मेत्यवदतो हि किं स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठाम् । न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य। वागेवायतनमाकाशः प्रतिष्ठा प्रज्ञेत्येनदुपासीत । का प्रज्ञता याज्ञवल्क्य। वागेव सम्राडिति होवाच। वाचा वै सम्राड्बन्धु प्रज्ञायत ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनु-

व्याख्यानानि व्याख्यानानीष्टं हुतमाशितं पायितमयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि वाचैव सम्राट् प्रज्ञायन्ते वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं वाग्जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वादेवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते ।

## भाषांतर.

**याज्ञवल्क्य**--राजा, दुसऱ्या कोणीं आचार्यांनीं जें काय तुला सांगितलें असेल तें ऐकूं या.

**जनकवैदेह**--जित्वा शैलिनि नांवाचा आचार्य मला म्हणाला **वाग् म्हणजे ब्रह्मच होय.**

**याज्ञवल्क्य**--राजा, ज्याला माता, पिता आणि आचार्य यांपासून ज्ञान प्राप्त झालें आहे, अशानें सांगावें असेंच शैलिनीनें वाग् म्हणजे ब्रह्मच होय हें तुला सांगितलें. कारण, बाबारे ज्याला 'वाणी' नाहीं त्याचा काय उपयोग ! परंतु वाणीचें आयतन [ उगम ] कोणचें ! व तिची प्रतिष्ठा [ राहण्याचें स्थान ] कोणती हें सांगितलें काय !

**जनक**-नाहीं, तें सांगितलें नाहीं.

**याज्ञवल्क्य**-तर मग तें त्यानें तुला पाव हिस्साच सांगितलें.

**जनक**—मग याज्ञवल्क्य, आपण पूर्णपणें सांगा.

**याज्ञवल्क्य**-राजा, मनुष्याची वाशक्ति हें तिचें आयतन, आकाश हें तिची प्रतिष्ठा आणि तीच प्रज्ञा असें जाणून तिची उपासना करावी.

**जनक**-मग ती प्रज्ञा कशी काय असते !

**याज्ञवल्क्य**-राजा, वाग् म्हणजेच प्रज्ञा, कारण वाणीच्या द्वारें शत्रुमित्र-भाव [ किंवा सदसद्भाव ] समजतो; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहासपुराणें, विविध विद्या, उपनिषदें, श्लोक [ स्मृति ] सूत्रें, त्यांचीं व्याख्यानें व अनुव्याख्यानें हीं समजतात; कशाचा यज्ञ केला, कशाची आहुति दिली, काय खाल्लें, काय प्यालों, हा लोक, परलोक, सर्वभूतें इत्यादिकांचें ज्ञान होतें. या वाणीच्याच योगें ब्रह्मज्ञान-वाग् म्हणजेच ब्रह्म अशा बुद्धीनें जो विद्वान् या वाग्ब्रह्माची उपासना करील त्याला वाक्प्राप्ति होते. सर्व भूतें त्याच्या स्वाधीन होतात. तो स्वतः देवच होतो व देवांत जाऊन मिसळतो.

वाङ्मय म्हणजे काय याची अशी सुंदर व्याख्या दुसऱ्या कोठेंसुद्धां असेल असें मला वाटत नाहीं. हें एक अत्यंत उदाररमणीय असें एका प्राचीन ऋषीनें केलेलें वाग्देवीचें स्तोत्रच आहे. ज्या ज्या ग्रंथसमूहाच्या, ग्रंथाच्या किंवा वाक्य-समुच्चयाच्या श्रवणानें मनुष्यास सत् कोणचें आणि असत् कोणचें हें समजतें, ज्याच्या पठणानें त्यास शुद्ध अशा आनंदाची प्राप्ति होते, ज्याच्या परिशीलनानें

त्याच्या मनांतील किल्बिष जाऊन तो श्रेष्ठ अशा पद्वीला–प्रत्यक्ष देवाच्या पद्वीला–जाऊन पोंचतो तो ग्रंथसमूह, ग्रंथ किंवा वाक्यसमुच्चय वाङ्मय या शब्दानें निदर्शित करण्यास मुळींच हरकत नाहीं. वाङ्मय या शब्दांत अशाच ग्रंथांचा अंतर्भाव होतो. ज्याप्रमाणें बृहदारण्यकांतली ही वाङ्मयाची ( literature ) व्याख्या दिली आहे त्याचप्रमाणें एका नामांकित फ्रेंच ग्रंथकारानें या शब्दाची सुंदर व्याख्या दिली आहे तीही येथें देतों आणि हल्लीं इंग्लंडांत वाङ्मयासंबंधानें जे केवळ अत्यंत श्रेष्ठ असे आचार्य मि जान् मोर्लेसाहेब, त्यांनींही दिलेली या शब्दाची व्याख्या आपल्यास वाचून दाखवितों, म्हणजे 'वाङ्मया' च्या अर्थासंबंधानें व व्यापकतेसंबंधानें प्राचीन ऋषी आणि अर्वाचीन पाश्चात्य ग्रंथकार यांच्या लिहिण्यांत पूर्णपणें अनुवाद आहे असेंच दिसून येईल. जॉन मोर्ले या नामांकित इंग्रज ग्रंथकारानें म्हटलें आहेः–

'Literature consists of all the books—and they are not so many—where moral truth and human passion are touched with a certain largeness, sanity, and attraction of form. My notion of the literary student is one who through books explores the strange voyages of man's moral reason, the impulses of the human heart, the chances and changes that have overtaken human ideas of virtue and human happiness, of conduct and manners, and the shiftiness, of fortunes, of great conceptions of truth and virtue. Poets, dramatists, humorists, satirists, masters of fiction, the great preachers, the character-writers, the maxim-writers, the great politicl orators—they are all literature in so far as they teach us to know man and to know human nature. This is what makes literature, rightly sifted and selected and rightly studied, not the mere elegant trifling that is so often and so erroneously supposed to be, but a proper instrument for a systematic training of the imagination and sympathies, and of a genial and varied moral sensibility.'

त्याचप्रमाणें सेंट बव्ह् नांवाच्या सुप्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकाराची व्याख्या ।ः–

'Literature consists of a whole body of classics in the true sense of the word and a classic is an author who has enriched the human mind, who has really added to

ts treasure, who has got it to take a step further; who has discovered some unequivocal moral truth, or penetrated to some eternal passion, in that heart of man where it seemed as though all were known and explored, who has produced his thought, of his observation, of his invention under some form, no matter what, so it be great, large, and acute and reasonable, sane and beautiful in itself; who has spoken to all in a style of his own, yet a style which finds itself the style of every body—in a style that is at once new and antique and is the contemporary of all the ages.'

पाश्चिमात्य ग्रंथकारांच्या मतें ' वाङ्मय ' या शब्दांत कोणकोणचा अर्थ अंतर्भूत होतो, आणि कोणकोणच्या गोष्टी त्या शब्दानें निदर्शित केल्या जातात हें आतां मीं वाचून दाखविलेल्या दोन्ही उताऱ्यांवरून स्पष्ट होतें. तेव्हां हा अर्थ आणि मघाशीं बृहदारण्यांतून वाचून दाखविलेल्या उताऱ्यांतील अर्थ सारतः अगदीं एक आहे असें कोणासही दिसून येणार आहे.

मनुष्याची सदसद्विवेकबुद्धि जागृत करून त्यास नेहमीं सन्मार्गांत ठेवण्यास कारण होणारे, त्याच्या विविध मनोवृत्तींचा विकास करून शुद्ध अशा आनंदाचा आस्वाद त्यास देऊन जें काय अशुद्ध, अपवित्र व क्षणिक त्यापासून दूर रहाण्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष बोध करणारे, नेहमीं उदाररमणीय अशा विचारांचा त्यांच्या मनांत संचार करवून, सत्याचे ठिकाणीं तो सदा लीन होईल असें करणारे, त्यांस मनुष्यत्वांतून काढून देवत्वास पोंचविणारे, असे जे कोणाचेही अंतःस्फूर्तीनें शब्दरूपानें बाहेर पडलेले, लिहून ठेविलेले किंवा उच्चारलेले विचार त्या सर्वांना समुच्चयानें वाङ्मय ही संज्ञा आहे.

वाङ्मय या शब्दांत इतक्या अर्थांचा समावेश होतो अशी माझी समजूत आहे. आणि या दृष्टीनें पहातां मराठी भाषेंत अभिमान बाळगण्याजोगें वाङ्मय आहे असें म्हणण्यास मला यत्किंचितही दिक्कत वाटत नाहीं.

इंग्रजी राज्याचा प्रसार होण्यापूर्वी मराठी भाषेंत जो ग्रंथसंग्रह निर्माण झाला त्या ग्रंथसंग्रहांत ललित ग्रंथसंग्रह म्हणजे इंग्रजी भाषेंत Belles Lettres या शब्दांत समाविष्ट होणारा ग्रंथसंग्रह नाहीं ही गोष्ट कबूल केली पाहिजे. परंतु मनाला उन्नत करून शुद्धानंद प्राप्त करून देणारा ग्रंथसंग्रह मराठींत खरोखरच आहे हें सहज कोणीही कबूल करील.

आजच्या या व्याख्यानांत एकोणिसाव्या शतकाचे प्रारंभींच पेशवाई गेल्यानंतर नवीन उत्पन्न झालेल्या ग्रंथसंग्रहाबद्दल व त्याच्या अभ्यासाबद्दल विवेचन

करण्याचा माझा विचार नाहीं. एक तर त्याच्या योगानें विषयाचा विस्तार फार होतो. शिवाय दुसरींही कांहीं कारणें मनांत येऊन मीं अकराव्या शतकापासून अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत अस्तित्वांत आलेल्या मराठी वाङ्मयाच्या संबंधानें मात्र बोलण्याचा विचार केला आहे.

## वाङ्मयाचा अभ्यास करण्याचे प्रकार.

मराठी वाङ्मयाचा अभ्यास करावयाचा असें मनांत योजिलें म्हणजे प्रारंभ कसा करावा, हा पहिला प्रश्न होय. कोणत्याही वाङ्मयाचा अभ्यास करणें झाल्यास दोन प्रकार दिसून येतात. ज्यांस वेळ पुष्कळ असेल व इतिहासदृष्टीनें आणि भाषाशास्त्राच्या दृष्टीनें वाङ्मयाचा अभ्यास करण्याची इच्छा ज्यांस असेल त्यांनीं स्वीकारावयाचा एक प्रकार, आणि ज्यांस अनेक कार्यें असल्यामुळें सूक्ष्मदृष्टीनें अभ्यास करण्यास वेळ नाहीं, परंतु आपल्या मातृभाषेंतील सौंदर्यस्थलें पाहून होणारा शुद्धानंद अनुभवावा अशी मात्र उत्कट इच्छा आहे अशा लोकांनीं स्वीकारावयाचा तो दुसरा प्रकार होय. पहिल्या लोकांनीं म्हणजे ज्यांस ऐतिहासिक दृष्टीनें व भाषाशास्त्रदृष्टीनें अभ्यास करावयाचा असेल त्यांना अगदीं आद्यग्रंथापासून प्रारंभ करून दर दर शतकांत भाषेचें व ग्रंथकारांच्या विचारांचें उत्क्रमण कसकसें होत गेलें हें पहात व तत्संबंधीं विचार करीत वाङ्मयाचा अभ्यास केला पाहिजे. दुसऱ्या प्रकारच्या लोकांची दृष्टि केवळ अर्थसौंदर्यावर किंवा शब्दचमत्कृतीवर असल्याकारणानें, त्यांस तुमच्या भाषाशास्त्राच्या नियमाशीं किंवा भाषापद्धतीच्या उत्क्रमणांशीं कांहीं करावयाचें नसतें. फावल्या वेळांत मनाची करमणूक करण्यासाठीं किंवा थोडक्यांत परमार्थज्ञान करून घेण्यासाठीं दिवसांतून तास अर्धा तास ज्यांस वाचन करावयाचें, त्यांचे हातून सूक्ष्मदृष्टीनें अभ्यास कोठून होणार ! याशिवाय ग्रंथांतील विषयांच्या दृष्टीनेंही अभ्यास करणारांचा तिसराच एक वर्ग निघेल. कोणास केवळ वेदांतपर ग्रंथच आवडतील, कोणास भक्तिपर ग्रंथांची मात्र गोडी असेल व कोणास केवळ काव्यात्मक ग्रंथांचीच अभिरुचि असूं शकेल. कसेंही जरी असलें तरी ऐतिहासिक दृष्टीनें मराठींतील सर्व वाङ्मयाचा अभ्यास कसा करावा याविषयींचें विवेचन केलें म्हणजे बाकीच्या दोन प्रकारांचें विवेचन आपोआपच त्यांत येऊन जाणार आहे.

## महानुभाव पंथाचे ग्रंथ.

ऐतिहासिक दृष्टीनें विवेचन करावयाचें म्हटल्यास मुकुंदराज, ज्ञानेश्वर, इत्यादि वेदांतकेसरी व नामदेवादि भक्तमुकुटमणी यांच्या ग्रंथांपासून प्रारंभ करून अठराव्या शतकाच्या अखेरीस झालेल्या जोशीबुवा व अनंतफंदी इत्यादि शृंगारलोलुप व वैराग्यपूर्ण शाहिरांपर्यंत चट साऱ्या कवींच्या ग्रंथांचें व त्यांच्या

भाषापद्धतींचें सूक्ष्मदृष्टीनें परिशीलन केलें पाहिजे. इतकेंच नव्हे, तर दुर-भिमान एकीकडे ठेवून मुकुंदराजाच्या व ज्ञानदेवाच्या आधीं कित्येक वर्षे झालेल्या महानुभाव पंथाच्या महंतांनीं लिहिलेल्या मराठी ग्रंथांचेंही सूक्ष्म अवलोकन करणें जरूर आहे. जर चांगला शोध केला तर असें दिसून येणार आहे कीं मराठी भाषेंत प्रथमतः ग्रंथ लिहिल्याचें श्रेय मुकुंदराज, ज्ञानेश्वर किंवा नामदेव यांजकडे नसून महानुभाव पंथाच्या लोकांचा जो आद्य ग्रंथ लीलाचरित्र त्या ग्रंथाच्या कर्त्याकडेच आहे. त्याचप्रमाणें कदाचित् असेंही आढळून येईल कीं, भगवद्गीता व भागवत यांवर महानुभाव पंथाच्या महंतांनीं ज्ञानेश्वर, एकनाथ वगैरे कवींच्या पूर्वींच टीका केलेल्या आहेत. हा महानुभाव पंथ अकराव्या शतकाच्या सुमारास-किंबहुना त्याच्याही किंचित् पूर्वीं अस्तित्वांत आला असावा असें दिसतें. या पंथाचा अत्यंत जुना ग्रंथ लीलाचरित्र नांवाचा गद्यांत आहे, असें मला कळलें आहे व त्यांतील भाषा ज्ञानेश्वरीपेक्षांही जुनी असावी असें दिसतें. निदान या ग्रंथाचा ' श्रुति ' म्हणून जो भाग आहे व ज्यांत या पंथाचे दोन महंत किंवा अवतारी पुरुष प्रशांत व चक्रधर यांचें चरित्र लिहिलें आहे, त्या भागाची भाषा तरी ज्ञानेश्वरीपेक्षां खचित अधिक जुनी असावी. याच ग्रंथांत स्मृति म्हणून एक भाग आहे. त्या भागांत देवगिरीच्या कांहीं राजांच्या म्हणजे सिंघणापासून राम-चंद्र यादवापर्यंतच्या राजांच्या चारित्रकथा आहेत. याच ग्रंथाला एक परिशिष्ट आहे. त्या परिशिष्टांत लीलाचरित्रांतील शब्दांचा सव्युत्पत्तिक कोश आहे, त्यास ते निरुक्त म्हणतात. प्राचीन मराठी भाषेंतील शब्दांच्या व्युत्पत्तीचा केलेला विचार मराठी वाङ्मयाचा अभ्यास करणारास फार उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. सिंघण राजाची कारकीर्द शके ११३२ पासून शके ११६९ पर्यंत होती. या कारकीर्दीच्या आधीं किंवा या कारकीर्दींत लीलाचरित्राचा श्रुतिभाग लिहिला गेला असला पाहिजे, असें मला भगवद्भक्त भास्करभाऊ नांवाच्या एका महानुभाव-पंथी गृहस्थाकडून मिळालेल्या माहितीवरून वाटतें. आणि हें वाटणें जर बरोबर असलें तर लीलाचरित्र हाच मराठींतील आद्य ग्रंथ होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या महानुभावी पंथाचे अवतारी पुरुष सोडून आचार्य कोण हें पाहूं लागलें तर असें दिसून येतें कीं, यांचे आद्य आचार्य नागदेवभट्ट होत. या नाग-देवाचा जन्म शके ११५८ त झाला, यांचे अनेक शिष्य होते, त्यांत त्यांचेच पुतणे कवीश्वर म्हणून होऊन गेले. या कवीश्वरांनीं भागवताच्या एकादश स्कंधावर ओंव्या रचिल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं आपल्यास आतां वाचून दाखवितों:–

**भगवत्स्तुतिपर**

**सह्याचळाचें चुळके, जयाचें प्रभामंडळ फांके ।**
**तो श्रीवत्स ललाटे फळके, नमस्कारितो असे ॥ १ ॥**

नमीन यादव कुळतिलकु, जो कैवल्यलता पुष्पस्तबकु ।
उदेला आनंद मृगांकु, मोहांधकारीं ॥ २ ॥
चैतन्याचा आळा, कैवल्य द्रुमु कोंभैला ।
तो चापगौर अभिवंदिला, चक्रधरू ॥ ३ ॥
पडलिया संसाराचिये अडणी, जो पूर्वी ब्रह्मविद्येची तवनी
तो आचार्य शिरोमणी, नमीन नागार्जुन ॥ ४ ॥
चैतन्याचीये खोल वाटे, पांता वेदाची धांव कुंठे ।
ते श्रीकृष्णरूपें नेटें बोटें, कवण वर्णू जाणे ॥ ५ ॥
र्घणितां यादव नरेंद्रु, ज्यंचा शिधे[1] सारस्वत मंत्रू ।
म्हणूनि उचकान फणेंद्रु, रची शब्दसागरातें ॥ ६ ॥
आतां श्रीकृष्णाचिये कीर्तिचंद्रिका, विकासली उन्मेषकालिका॥
तरी जनाचिया मनोनासिका, सुपरिमळ करी ॥ ७ ॥

( कवित्व )

पुराणींचे दळवाडे, रसाळ अळंकार साबडे ॥
म्हणोन भावना निवडे, कळा विलासी ॥ १ ॥
तया प्रमेयाची वोळवणें, तरी साहित्याचें वोल्हावणें ॥
तरी कविता वश करणें, कवणासि नव्हे ॥ २ ॥
तैसा सुवर्म जोडे श्रोता, तरी रसभावीं फुले कविता ।
तवरें[3] येती सारस्वता, नऊ रसाचे ॥ ३ ॥
सामतयाची आणी, रोवोनि ओविजे मुक्तामणी ॥
तरी चक्रवर्तीचा कंठ भूषणीं, योग्य होय ॥ ४ ॥
तैसा जनाचिया सभा, शोधिजे शब्दरत्नाचा गाभा ।
तयीं मिरवे अलंकार शोभा, कविता वधूसी ॥ ५ ॥
तिये कवितेची गोडी, कोकिळाची तराय मोडी ॥
गीतसाळ करी कुडी, किन्नरासी ॥ ६ ॥
आपुला कळरवी, कविता कलहंसातें पढवी ॥
ते रंगमाधुर्ये शिरवी, मधुकरातें ॥ ७ ॥
अंगींच्या सौरम्यकला, उणें आणि परिमळा ॥
गांभीर्य करी अवकळा, गगन गंगेसी ॥ ८ ॥
रतीचिये भ्रूलतेसी, तेथ चातुर्य कायसी ॥
पडप दे संध्या वधूसी, अंगरागाचे ॥ ९ ॥

---

१ होय. २ अंतःकरण. ३ बहर.

पद प्रमेयाचे गुंफणें, श्यामाभुज बंधाते जिणें ॥
कोवळीक घाली शिरणे, शिरिष पुष्पासी ॥ १० ॥
नीचनीच[1] तारांगणां, दीजेल संध्यारागाचे रावण।
तरी अक्षराचे सुरंगपण, अधिक दिसे ॥ ११ ॥
पदाचा मेळावा, रत्नाकरा करवी चढावा ।
प्रमेय करी हेवा, अमृत लहरीसी ॥ १२ ॥

## कांहीं श्लोक.

जाला कुजाति कागें सकळ जन पीडले ज्या विसर्गे ॥
त्याचे मांडोनि टागें[3] आणि अरिवेगे मारिला वत्सुरागें ॥
ध्यांनीं जीवा कुदृष्टी बक धरुनि मुखीं फाळिला चंचुपूटीं ॥
रामातें नेतपाठीं गत गगनतटीं दिल्हि मोठी प्रलंबा ॥ १ ॥
वेणू श्रीचक्रपाणी अमृत धवधनी पूरली विश्ववाणी ॥
कामाख्या कामबाणीं व्रजयुवति गणी सांधणी मन्मथाची ॥
गौरा श्याम प्रहृष्टा उभय कुचतटा माजि मारा वसैठा ॥
लाटा शुद्धा सुभटा मदनकटितटा वंकटा भूविशिष्टा ॥ २ ॥
चक्रेशा त्राहि मातें शुभ सुकृतपथें लागलें राखसीं तूं ॥
तें नाहीं नीज नाथा सुरु सकळ पथा नातळे सर्वथा मी ॥
कामक्रोधांधकारी रजतमकुहरी सप्त पाताळ वेन्हीं ॥
गेला पैशून्य भारी म्हणवुनि शिकरी काढि सर्वज्ञ नाथा ॥३॥

वरील ओंव्या व श्लोक हीं वाचल्याबरोबर आपणांस असें वाटतें, कीं ही भाषा ज्ञानेश्वराच्या काळची खरी, व ज्ञानेश्वर जेथें अवतीर्ण झाले त्या प्रांतींचीही खरी. ज्ञानदेवाचे अभंग, नामदेवाचे अभंग वगैरेंतील भाषा आणि ज्ञानेश्वर व कवीश्वर आणि हयग्रीव हे महानुभाव कवी यांची ही भाषा यांत किती तरी महदंतर आहे ! भिंगारकरबोवा आणि भारद्वाज यांच्या दरम्यान झालेल्या वादांत बोआंनीं असें सिद्ध करण्याचा यत्न केला आहे कीं, एक तर या दोन भाषांत विशेषशी विषमता नाहीं, आणि असली तरी ती ध्यानांत घेण्याजोगी नाहीं. परंतु या दोन्ही गोष्टी सिद्ध झाल्या असून भारद्वाजांनीं उपस्थित केलेला वाद समाप्त झाला असें अजून म्हणतां येणार नाहीं. अजून त्याचेवर पुष्कळ प्रकाश पडावयास पाहिजे आहे. तो कदाचित् कालांतराच्या शोधानें पडण्याचा संभव आहे. माझ्या एकंदर सांगण्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं महानुभावांच्या ग्रंथांचा शोध केल्यास आपणास ज्ञानेश्वरीच्या कालाच्या मराठी भाषेचें स्वरूप चांगल्या तऱ्हेनें

समजण्यास पुष्कळच मदत होणार आहे; कांकी त्यांच्या या ज्ञानेश्वराच्या समकालीन ग्रंथांत त्यांनीं शब्दकोश वगैरेही दिलेले आहेत.

## मुकुंदराज.

महानुभाव ग्रंथकार सोडले तर पुढें मराठी भाषेचा आद्य कवि कोण हा एक लहानसा वाद उपस्थित होतोच. साधारणतः समजूत अशी आहे कीं मुकुंदराज हा मराठी भाषेंतील आद्य कवि होय. व त्याचा विवेकसिंधु हा मराठींतील आद्य ग्रंथ होय. परंतु पुनः भाषेच्या दृष्टीनें पाहतां ज्ञानेश्वरीची भाषा जुनी असें निदर्शनास येऊन मुकुंदराजाचा विवेकसिंधु भाषेच्या दृष्टीनें तरी ज्ञानेश्वरीपेक्षां शेंसवाशें वर्षांनीं आर्वाचीन असावा असें अनुमान करण्याचा मोह होतो. विवेकसिंधूंत पूर्वार्धाच्या शेवटीं

" नृसिंहाचा बल्लाळ । तयाचा कुमर जैत्रपाळ ॥
तयें करविला हा गदारोळ । वेदांताचा "

असा आपल्या कवित्वास आश्रय देणाऱ्या राजाचा व त्याच्या त्रयीचा उल्लेख आढळतो. इतिहासांत पाहतां अद्यापिही नृसिंह, बल्लाळ, जयंतपाळ अशी त्रयी कोठेंही सांपडत नाहीं. म्हैसूरच्या होयसळ राजांची वंशावळी पाहतां नृसिंह त्याचा बल्लाल पुनः त्याचा नृसिंह व पुनः त्याचा बल्लाळ अशी परंपरा सांपडते. या शेवटल्या बल्लाळाचा पराभव होऊन त्यास स्वस्थ बसावें लागलें होतें व या बल्लाळाच्या पुढचा जयंतपाळ राजा असून तो कसा तरी आपलें लहानसें राज्य राखून राहिला असावा व त्याचे पदरीं मुकुंदराज होता असें अनुमान करण्याजोगें आहे. या अनुमानावरून पाहतां ज्ञानेश्वराच्या नंतर मुकुंदमुनी झाले असावे व त्यांचे ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या नंतरचे असावे असें वाटतें. मुकुंदमुनीचा संस्कृत विवेकसिंधु आहे त्यांत दिलेली मुकुंदमुनीची गुरुपरंपरा व मराठी विवेकसिंधूंतील गुरुपरंपरा ह्या एक आहेत. परंतु मराठी ग्रंथ हा संस्कृत ग्रंथाचा बरोबर तर्जुमा नाहीं. ते ग्रंथ एकाच ग्रंथकाराचे असावे असें मात्र वाटल्यावांचून रहात नाहीं. वर सांगितलेल्या शेवटल्या बल्लाळानंतर कोणी जयंतपाळ झाला किंवा काय व तो झाला असला तर केव्हां झाला, याचा निश्चय होईपर्यंत मुकुंदमुनीच्या काळाबद्दल कांहींच निर्णय करतां येत नाहीं. परंतु संस्कृत विवेकसिंधूच्या शेवटीं

शिष्ये धन्येषु सत्स्वप्यहमधिककृपापात्रमस्यास्मि जातो
ग्रंथं मद्बोधसिद्ध्यै कुरु शिशुसुगमं ज्ञानसर्वस्वसारं
एवं विज्ञापितः सन्नवनतशिरसा ज्ञान-देवेन धीमान्
सद्यः कृत्वा विनास्मै (?) सकरुणहृदयः श्रीमुनींद्रो मुकुंदः

असा श्लोक आहे. या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें अवनतशिर होऊन मुकुंदराजांकडे शिशुसुगम असा ग्रंथ करण्याविषयीं विज्ञापना करावयास जाणारा हा ज्ञानदेव

कोण ! याचाही तपास लागला पाहिजे. त्याचप्रमाणें मुकुंदमुनींच्या संस्कृत ग्रंथाचें खरें नांव काय याचाही उलगडा करून घेतला पाहिजे. डेक्कन कालेजांतून या ग्रंथाची मीं एक प्रत आणली, तिच्या रूपुस्तावर विवेकसिंधु हें नांव आहे, परंतु उत्तरार्धाचे शेवटीं " इतिश्री मुकुंदराजविरचिते परमार्थ प्रबोधे सच्चिदानंद-पदविवेको नाम उत्तरार्ध प्रकरणं समाप्तिमगमत् " असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें याचे प्रारंभीं व शेवटींही हा ग्रंथ " अनंत मुनेः सुखाय " म्हणजे अनंत मुनीच्या सुखासाठीं रचिला आहे असें म्हटलें आहे. हा अनंत मुनी तरी कोण ! हेंही समजत नाहीं.

या सर्व घोटाळ्यावरून मीं एक अनुमान इतकेंच बांधलें आहे कीं, मुकुंदराजांनीं संस्कृत ग्रंथ लिहिला व पुढें शेंपन्नास वर्षांनीं त्या ग्रंथाच्या आधारानें कोणी तरी मराठी विवेकसिंधु करून आपलें नांव न घालतां मुकुंदराजांच्याच नांवानें प्रसिद्ध केला असावा. परंतु हें माझें निव्वळ अनुमानच आहे. आणखी पुष्कळ व पक्का शोध लागेपर्यंत मी तसा पूर्वपक्ष करण्यास तयार नाहीं.

आद्य कवि कोण, या वादांत कांहीं विशेष महत्वाचा तथ्यांश असतो, अशांतला भाग मुळींच नाहीं. तथापि असल्या प्रश्नांचा निकाल लागण्यासाठीं निर-निराळ्या लोकांनीं प्रयत्न करून काढिलेली जी माहिती जगापुढें येते, ती बरीच महत्वाची व उपयोगीं असते. मुकुंदराजाचें वसतिस्थान जोगाईचें आंबें म्हणून मोंगलाईत गांव आहे, तें असावें असें दिसतें. कारण विवेकसिंधूच्या उत्तरार्धाचे शेवटीं या गांवाचें नांव आलें आहे. येथें आपला परम गुरु हरिनाथ हा महा सिद्ध पुरुष होता व त्यानें मोठा थोरला यज्ञ वगैरे केला असें मुकुंराजांनीं लिहिलें आहे.

आदि श्रीगुरु आदिनाथ । तेथुनि श्रीगुरु हरिनाथ ।
तयाचा श्रीगुरु रघुनाथ । जो गुणसिंधु ॥

अशी गुरुपरंपरा देऊन नंतर आपला गुरु जो रघुनाथ किंवा रामनाथ त्याचा गुरु म्हणजे आपला परमगुरु हरिनाथ याचें वर्णन केलें आहे. त्या ओंव्या अशाः—

वैन गंगेचे तीरीं । मनोहर *अंबानगरी ॥
तेथें प्रगटला श्रीहरि । जगदीश्वर जो ॥ १ ॥
माध्यंदिन शाखे । अवतार केला परमपुरुषें ।
चापेगोरटें निवेशें । अति मनोहर ॥ २ ॥
श्रीवत्सपद लपविलें । तें दक्षिणजंघेसि दाखविलें ।
कलियुगीं अवतरण केलें । म्हणोनियां ॥ ३ ॥

---

*ठाणें येथील व्याख्यान झाल्यानंतर बरेच दिवसांनीं या ' अंबे ' गांवच्या एका गृहस्थांनीं मला ' योगेश्वरीमाहात्म्य ' नांवाचा एक संस्कृत ग्रंथ आणून

या हरिनाथाच्या उजव्या मांडीवर श्रीवत्सासारखी कांहीं तरी खूण असावी असें दिसतें:-

मुकुंदराजाचे दोन ग्रंथ, एक ' विवेकसिंधु ' आणि दुसरा ' परमामृत ' हे फार सुप्रसिद्ध आहेत. परंतु आउफ्रेख्टसाहेबांनीं ग्रंथांची जी जंगी यादी प्रसिद्ध केली आहे, तींत आणखी पांच ग्रंथ त्यांचे नांवावर आढळतात. ते ग्रंथ मला पहाण्यास मिळाले नाहींत. परंतु सातही ग्रंथांचीं नांवें देतों.

१ अद्वैतज्ञानसर्वस्व.
२ अष्टावक्रगीताभाष्य.
३ आत्मबोध.
४ पंचीकरण.
५ विवेकसारसिंधु.
६ विवेकसिंधु अथवा वेदांतार्थविवेचनमहाभाष्य.
७ परमामृत.

---

दाखविला. ही ' योगेश्वरी ' म्हणजे या ' अंबानगरी ' ची अधिष्ठात्री देवता होय. हिच्यावरूनच या स्थानाला ' जोगाईचें अंबें ' असें म्हणतात. हें माहात्म्य म्हणजे सुमारें ३२०० श्लोकांचा ३० अध्यायांचा ग्रंथ आहे. यांत २२ व्या अध्यायांत या गांवचे सिद्ध म्हणून मुकुंदराजाची व आणखी पांच सिद्ध पुरुषांच्या कथा आल्या आहेत. हा ग्रंथ पुराणाच्या धर्तीवर लिहिलेला आहे. प्रत्यक्ष शंकरानें रेणुकनाथाला हें योगेश्वरीमाहात्य सांगितलें व तें पुढें सूतांनी शौनकादिकांना सांगितलें असा यांत उपोद्घात आहे. रेणुकनाथ हा मुकुंदमुनींचा शिष्य असें म्हटलें आहे. इतिहास या दृष्टीनें या ग्रंथाची अर्थातच कांहींसुद्धां योग्यता नाहीं. इतकेंच नव्हे तर हें भविष्योत्तरपुराणांतर्गत " योगेश्वरीमाहात्म्य " रचणारास " अमृतानुभव " हा ग्रंथ कोणाचा आहे हें माहित नाहीं. त्यानें विवेकसिंधु आणि अमृतानुभव हे दोन ग्रंथ मुकुंदमुनींचे असें म्हटलें आहे ! या बाविसाव्या अध्यायांत जैत्रपाळाचाही उल्लेख केला आहे. परंतु तो कोणी जिनधर्मी राजा असून तो ब्राह्मणधर्मीयांचा–विशेषतः ब्राह्मणांचा–छळ करी. सिद्धि दाखवा असें म्हणून त्यांचे पाठीस लागे, असें लिहिलें आहे. मुकुंदमुनी त्याच गांवचे, परंतु ते काशीस गेले होते. तेव्हां जयपाल ब्राह्मणांस सिद्धि दाखविण्याविषयीं फार त्रास देतो आहे हें त्यांस कळलें. सिद्धि दाखवितां येत नाहीं, तर माझ्या पागेस लागणारे हरबरे तुम्हांस भरडण्यास लावीन असें म्हणून त्याप्रमाणें ब्राम्हणांस त्यानें हरबरे भरडण्यास लावलेंही होतें. मुकुंदमुनी परत येतांच जैत्रपाळानें त्यासही सिद्धि दाखवा नाहीं तर हरबरे भरडण्यास बसवीन असें म्हटलें. तेव्हां बरें बाबा असें म्हणून त्यांनी आपल्या हातांत धरण्याच्या काठीस ' राजा सांगतो आहे, तर हरबरे

[ पान १६ पहा.

मुकुंदराजांविषयीं आज आपल्याला जी माहिती मिळते आहे ती इतकीच आहे.

## नामदेव.

मुकुंदमुनींच्या नंतर नामदेव व ज्ञानेश्वर हे–आजपर्यंत मानीत आलेल्या जन्मतिथी खऱ्याच आहेत असें धरून चालल्यास समकालीन कवि झाले. नामदेव इ. स. १२७० ते १३५० पर्यंत होते व ज्ञानेश्वर १२७१ ते १२९३ पर्यंत होते, अशी साधारणतः समजूत आहे. ज्ञानेश्वर हे इ. सनाच्या तेराव्या शतकाच्या शेवटीं होते, ह्याला आधार खुद्द ज्ञानेश्वरींतच आहे. ज्ञानेश्वरी ही भगवद्गीतेवरील टीका शके १२१२ त म्हणजे इ. स. १२९०–९१ चे सुमारास केली असा उल्लेख ज्ञानेश्वरीचे शेवटीं केला आहे. तेव्हां तें वर्ष बरोबर आहे असें धरण्यास मुळींच हरकत नाहीं. परंतु नामदेव हा ज्ञानेश्वरांच्या समकालीन होता हें अद्यापि नीटपणें मनावर बिंबत नाहीं. याला कारण पुनः ज्ञानेश्वराच्या ओंव्या आणि नामदेवाचे अभंग यांतील भाषावैषम्यच होय. मुकुंदराजांचा विवेकसिंधु व ज्ञानेश्वरी यांतील भाषेच्या विसदृशतेपेक्षां नामदेवाच्या अभंगांतील व ज्ञानेश्वरींतील भाषांची विसदृशता फारच विलक्षण आहे. नामदेवाचा गाथा म्हणून जो अभंगसंग्रह आज उपलब्ध आहे हाच जर खरा असेल, तर या गाथ्याचा कर्ता नामदेव ज्ञानेश्वराशीं खचित समकालीन नाहीं असें म्हटल्यावांचून राहवतच नाहीं. नामदेवाच्या गाथ्याची भाषा तुकारामबोआंच्या अभंगासारखी वाटते. यामुळें असें वाटतें कीं, सध्यां उपलब्ध असलेल्या गाथेचा कर्ता सुमारें सोळाव्या शतकांत झालेला असावा.

असलें विधान करणें मोठें धाष्टर्याचें वाटेल, परंतु जें वाटतें तें सांगण्याला कांहीं हरकत दिसत नाहीं. असो; परंतु आपण असें धरून चालूं कीं, नामदेव हे कुटुंबकवि ज्ञानेश्वरीकारांचे समकालीन होते. ते ज्ञानेश्वरांचे आधीं जन्मले, तेव्हां ते आधींचे असें धरून आपण त्यांचे ग्रंथासंबंधानें चार शब्द बोलूं.

अशी कथा आहे, कीं नामदेव प्रथम फार द्वाड होते, व पुढें त्यांचा तो द्वाडपणा इतक्या थराला गेला, कीं वाटमाऱ्या करण्याचें धाडस करण्याची प्रवृत्ति त्यांस झाली. परंतु कांहीं कारणानें लवकरच त्यांस पश्चात्ताप होऊन त्यांनीं तो मार्ग सोडून भगवद्भजनाचा मार्ग धरला. त्यांस अभंग करण्याचा नाद लागला व

---

भरडून ये ' म्हणून आज्ञा केली. त्याबरोबर काठी जात्यांत जाऊन बसून तिनें हरबरे भरडण्यास सुरवात केली ! नुसती काठी हरबरे भरडते आहे हें पाहतांच सिद्धि पाहूं इच्छिणाऱ्या राजाचे डोळे उघडले व त्यानें सर्व ब्राह्मणांस मुक्त करून मुकुंदमुनीपुढें लोटांगण घालून त्यांचें शिष्यत्व पत्करलें ! मुकुंदराजांनीं आपल्या ग्रंथांत सांगितलेल्या गुरूंचें या ग्रंथांत नांवही नाहीं.

त्यांचे नादानें त्यांचे सर्व कुटुंबास तो नाद लागला. म्हणून यास कुटुबकावे म्हटलें आहे. यांचें सगळें कुटुंब अभंग करी याबद्दल एक अभंग आहे तो असाः—

**गोणाई राजाई दोघी सासूसुना । दामा नामा जाणा बापलेक ॥ १ ॥**
**नारा म्हादा गोंदा विठा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥ २ ॥**
**लाडाई गोडाई येसाई साकराई । चौघी सुना पाही नामयाच्या ॥ ३ ॥**
**निंबाई ते लेकी नाऊबाई बहिणी । वेडीपिशी जनी दासी त्याची ॥ ४ ॥**
**इतुक्याही जणीं अभंग आरंभिले । देवें पूर्ण केले नामा म्हणे ॥ ५ ॥**

ज्ञानेश्वराचे समकालीन मुख्य **ना**मदेव असून त्यांचे पुढें दुसरा कोणी **ना**मदेव झाला, त्याचे अभंग पहिल्या **ना**मदेवाच्या अभंगांत मिसळून जाऊन जर सध्यांचा प्रचारांत असलेला गाथा झाला असला, तर सध्यांच्या अभंगाच्या गाथ्याची फार कसोशीनें निवड झाली पाहिजे. ती होईपर्यंत हा **नामदे**वाबद्दलचा प्रश्न आपणांस बुचकळ्यांतच ठेवणार यांत शंका नाहीं. **नामदे**वांनीं महाभारतावर ओंव्या रचिल्या आहेत, असें **नामदे**वांच्या चरित्रांत कोठेंही नाहीं. परंतु आज मितीस " **विष्णुदास नामा** " यानें रचिलेल्या ओंवीबद्दल महाभारताचीं पर्वें बऱ्याच ठिकाणीं सांपडतात ! तेव्हां पुनः हा प्रश्न आलाच, कीं ओवीबद्ध भारत करणारा **नामदेव** आणि गाथाकार **नामदेव** हे एक होते कीं भिन्न होते ? मीं स्वतः या ' **विष्णुदास नामा** ' च्या महाभारतांतलीं दोन पर्वें पाहिलीं आहेत. पैकीं **कर्णपर्व** मजजवळ आहेही. त्यांतून **कर्ण** अर्जुन यांच्या युद्धाच्या वर्णनाचा एक लहानसा उतारा आपल्यास सादर करतों त्यावरून त्या ग्रंथाची योग्यता काय आहे तें आपलें आपल्यासच अजमावतां येईल.

**ते दोघे धनुर्धर । श्रेष्ठ भारतींचे वीर ॥**
**संग्राम करित रणरंगधीर । आलोठ नुखळती (?) येकमेका ॥१॥**
**वीर दोघेही साधक । येकाहून येक अधिक ॥**
**एकमेकां हांकीति एक । युद्धें करिती दारुण ॥ २ ॥**
**येकाचा परशुराम गुरु । येकाचा द्रोण धनुर्धरू ॥**
**ते दोघे नावाधिले (?) वीरू । रणीं भिडती कर्ण पार्थ ॥ ३ ॥**
**दोघे मांडूनि ठाण । येकमेकांवरी घालिती बाण ॥**
**तंव देव म्हणती निर्वाण । आजि दोघीं मांडिलें ॥ ४ ॥**
**बाणीं दाटलें आकाश । अंधःकारू पडला दिशांस ॥**
**रीगु नाहीं पवनास । तेथें रवी रश्मे कैंचीं ॥ ५ ॥**
**बाणीं बाण आदळत । कल्लोळ अग्नीचा उठत ॥**
**विमानें आहाळती म्हणून हांक देत । देव नावेक परतें करिती ॥६॥**

घार तेजांचा उठला कल्लोळ । तेणें तापलें भूमंडळ ॥
दशदिशा हलकल्लोळ । दोन्ही सैन्यें आदळती ॥ ७ ॥
तरि तें बाणजाळ जाण कैसें । महा प्रळयींचें काळकूट जैसें ॥
कीं ब्रह्मप्रळयींचें दिसे । जैसें उचंबळलें उदक ॥ ८ ॥
तो नारायणाचा असे खेळ । तेजें कोंदलें गगनमंडळ ॥
तरि तेणें पाताळ । दुमदुमिलें असे ॥ ९ ॥
घोर दोघां वीरांत पेटलें । बाणाचें कोचळें पडिलें ॥
जेंवि मेहुडें पर्वतीं बैसलें । न दिसे कांहीं ॥ १० ॥
अथवा महा प्रळयींचा अंधकार । थोर उठला घोरांदर ॥
तैसें दाट शेर । घातलें असति येकमेकां ॥ ११ ॥
ते दोघे संधान करिती । बाणासि बाण आदळती ॥
तरि तया गजरें खचतीं । शिखरें पर्वतांचीं ॥ १२ ॥
तरि ते दोघे वीर परियेसीं । अभंग न भीति येकमेकांसी ॥
आवढ लोठलोठासी ( ? ) नवजति येकमेकां ॥ १३ ॥
प्रळयींच्या अंतीं । काळ महाकाळ भिडती ॥
तैसे दोघे युद्धें करिती । सांडोनि भय मरणाचें ॥ १४ ॥
वीर पेटले महामारा । आणी वार होती येरयेरां ॥
तयांचा संग्राम सांगतां पुरा । कवणा मति येवढी ॥ १५ ॥

× × × × × × × ×

आता येथून पुढती कथा । काय ऋषी सांगे नृपनाथा ॥
तरि तेंचि श्रोतां । नामा सांगे विष्णुदास ॥

हा विष्णुदास नामा कोण याचा पत्ता लागेल, तर फार चांगलें होईल. आपणांस असें दिसेलच, कीं या ओव्यांतली भाषा नामदेवाच्या अभंगांच्या भाषेपेक्षां बरीच जुनी आहे. हें महाभारत एकवार प्रसिद्ध झालें तर बरें होईल. या भारताचें आदिपर्व किंवा स्वर्गपर्व जर सांपडेल, तर फार चांगलें होईल. आदिपर्वाच्या प्रारंभीं किंवा स्वर्गपर्वाच्या शेवटीं कवीची हकीकत दिली असण्याचा संभव आहे. मीं पाहिलेल्या दोनही पर्वांच्या शेवटीं “ नामा विष्णूदास ” या नांवाखेरीज दुसरें कांहीं नाहा. नामदेवाचे अभंग अत्यंत भक्तिरसानें ओथंबलेले आहेत हें कांहीं कोणी सांगावयास पाहिजे असें नाहीं. तुकारामाच्या अत्यंत विशुद्ध अशा भक्तिरसाचें स्फूर्तिस्थान नामदेवाचे अभंग होत. पण शोधाअंतीं कदाचित् असें आढळेल कीं गाथाकार नामदेव नवा व भारतकार नामदेव जुना. गाथाकार नामदेव तुकारामाच्या आधीं पन्नास पाउणशें वर्षेंच झाला असावासें वाटतें.

# ज्ञानेश्वर.

नामदेवाच्या काळींच-मघाशीं सांगितलेला १२७० ते १७५० हा काल बरोबर असला, तर-मराठी वाङ्मयाच्यासंबंधानें जीस अगदीं श्रेष्ठतम पदवी दिली पाहिजे, अशी एक महाविभूति झाली. या विभूतीचें नांव 'ज्ञानेश्वर' होय. या विभूतीनें केलेला भगवद्गीताटीकात्मक ज्ञानेश्वरी ग्रंथ कालाच्या दृष्टीनें मराठी वाङ्मयांतला 'आद्य' ग्रंथ असो किंवा नसो, परंतु अंतस्थ गुणाच्या योगानें-भाषासौंदर्यानें, शब्दलालित्यानें, दृष्टांतरमणीयतेनें, अलंकारशोभेनें, व सगळ्यांत विशेष, स्फूर्तिप्रेरितकवितापरिपाकानें-हा ग्रंथ मराठी वाणीचें शिरोभूषण झाला आहे यांत शंका नाहीं. मराठी भाषेंत आपण गीतेसारख्या ग्रंथावर टीका लिहिली, या गोष्टीचा ज्ञानेश्वरास मोठा अभिमान वाटत असे, तो अगदीं यथार्थ असे. त्या काळीं मराठी भाषेंत ग्रंथ लिहिणें म्हणजे एक अगदीं हलकेपणाचेंच नव्हे तर शास्त्रनिषिद्ध काम समजलें जात असलें पाहिजे. परंतु स्वराज्य असलें, म्हणजे असले दुराग्रह नष्ट होऊन साधारण लोकांकरितां प्रचलित भाषेंत ग्रंथ करणें हें एक अवश्यक कर्तव्यच होऊन बसतें. पहिले महानुभाव मोठे विद्वान् पंडित झाले, त्यांनीं साधारण लोकांत ज्याचा प्रचार व्हावा असला धर्म उपस्थित केला. तेव्हां त्या धर्मप्रसारासाठीं उपयोगीं पडणारीं अशीं धर्मपुस्तकेंही अर्थातच प्रचलित भाषेंत लिहिण्याचा त्यांना प्रचार पाडावा लागला. शिवाय त्या वेळचे राजेही मराठी भाषेचे पुरस्कर्ते, कारण स्वतःमराठे. ज्ञानेश्वरीकारांचे वेळीं रामचंद्र किंवा रामदेवराव यादव हा राजा राज्य करीत होता, असा उल्लेख ज्ञानेश्वरींत आहेच. या ज्ञानेश्वरांचें चरित्र आतां येथें मी देत बसत नाहीं. तें चरित्र बहुतेक सर्वविश्रुत आहे. संन्याशानें पुनः गृहस्थाश्रम घेऊन झालेल्या पुत्रांपैकीं ज्ञानेश्वर होत. यांस दोन भाऊ होते आणि एक बहीण होती. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे वडील बंधु आणि गुरुही होते व बहिणीचें नांव मुक्ताबाई होतें. या ज्ञानेश्वरांचे नांवावर बरेच ग्रंथ मोडतात, पैकीं खरोखर फारच महत्त्वाचे असे दोनच ग्रंथ होत. १ ज्ञानेश्वरी व २ अमृतानुभव. आणखी त्यांचे नांवें मोडतात किंवा त्यांनीं केले आहेत असे ग्रंथ ३ स्वात्मानुभव, ४ पंचीकरण, ५ चांगदेव पासष्टी, ६ समास, ७ योगवासिष्ठ, ८ हरिपाठ, व ९ अभंग. शिवाय ज्ञानेश्वरांचें 'आत्मपत्र व लेखणी' आणि 'ज्ञानेश्वरमनन' असे दोन छोटेखानी ग्रंथ माझे पाहाण्यांत आले आहेत. आत्मपत्राची भाषा ज्ञानेश्वराचीशी वाटते, परंतु त्यांत शेवटीं प्रतिष्ठानच्या एकनाथाचा उल्लेख आहे त्यामुळें ज्ञानेश्वरानेंच तें लिहिलें असें म्हणण्यास फार मोठी अडचण आहे. ज्ञानेश्वरांच्या संबंधाची त्या पत्रापासून थोडी माहिती मिळण्याचा संभव आहे. म्हणून तें पत्र वाचतों.

## श्री ज्ञानेश्वराचें पत्र ॥ लेखणी ॥

नयनाचे अंजनि । माजि लेखणी भरूनि ।
देखण्याची मिरवणी । त्या निवृत्ति हातें ॥ १ ॥
ऐसें हें पत्र । स्वानन्दमय स्वतंत्र ॥
शुद्धश्वत विचित्र । हें ऐसें गे माय ॥ २ ॥
नवलानवल । या डोळ्याचि बोल ॥
अबोलणें बोल । उठताति ॥ ३ ॥
अवो माय अवो माय । या माजि भि न समाय ॥
अगम्यागम्य सोय । निवृत्ति लेहावि ॥ ४ ॥
नयनाचें अंजन पहिलें । हें या पात्रिं खलिलें ॥
अखलु खला आलें । हें देखणियां ॥ ५ ॥
श्वेतातीतश्वेत निळें । देखणियांच्या काळें ॥
डोळयानें खलिलें । अखलुवो माय ॥ ६ ॥
अव्यक्त रेखणें । यया परि देखणें ॥
रेखाटिलि येणें । निवृत्तिराजें ॥ ७ ॥
रखणिया पाठिं । अलक्षरेखा उठि ॥
ऐसि हे गोमटि । निजपात्रिका ॥ ८ ॥
अवो माय अवो माय । न बोलतें बोलुं काय ॥
ऐसिया निवृत्तिरायें । बोलविलें माये ॥ ९ ॥
चहुंरकानियावर । माथा अलक्षवकार ॥
या निवृत्तिचा कर । चपल मिरवे ॥ १० ॥
मिरवे चपलपणीं । चहुंरकानिया माजि देखणे ॥
माजि डोलयांचे पाणि । खेलतसे ॥ ११ ॥
नवला नवल करणिं । नवला नवल केणिं ॥
माजि बहुकालिं देखणि । कैसें डोलियानें लिहिलें पत्र ॥१२॥
अक्षर डोळा अगुणि । अविनाश लेखणि ॥
माजि बहुकालिं देखणि । लिहितसें ॥ १३ ॥
पाहातें पाहाण्या परी । पाहण्यांतील सरी ॥
या अक्षरें मोहरि । धरियलि गे माय ॥ १४ ॥
चहुंरकानियांवरिल साना । सहज औठ ऊर्ध्वकाना ॥
हे देखणियांच्या मना । निवृत्ति लिही ॥ १५ ॥

चपलपणें डोळां । अव्यक्ताक्षर सोहळा ॥
चपलपणें लिहिला । जाणवीगे माय ॥ १६ ॥
हा निर्जि निवृत्तिनाथ । अक्षर उमटवित ॥
चपलपणें हात । मिरवे गे माय ॥ १७ ॥
होतें ते हें नाना । समरसि येकत्र माना ॥
डोलियांचिये लेखणी । निवृत्ति लिहि ॥ १८ ॥
सहजाचा हा तुला । घेतांचि माथुला ॥
अव्यक्त बुद्धि बोलला । ये पत्रिकेवरि ॥ १९ ॥
तैं ते लेखन केलें । आतौतें बोललें ॥
हें पहाणें वालें डुलहं । या निवृत्तिचें ॥ २० ॥
आता अक्षरें पत्रिकेवरि । किं पत्रिका या अक्षरीं ॥
अड्डांगिं अक्षरें सारिं । हे पत्रिकाचि ॥ २१ ॥
तेविं निर्जि निजबोलि । उमटलें या स्वमेली ॥
हे देखणि आलि । लेखना गे माय ॥ २२ ॥
देखणिं देखे देखणिं या । होउनि लेखणि लिहीतया ।
चपलपणें मिरवे तया । निवृत्ति राजया करिं ॥ २३ ॥
अक्षरें लिहिति करासि । कर मिरवे अक्षरासि ।
हा निवृत्तिरासि । अंगांगेंसि ॥ २४ ॥
अनंगाच्या वदनिं । अनिर्वाच्य बोलणि ॥
हे मौन विसर्जुनि । लेखन गे माय ॥ २५ ॥
मौनाचें निजमौन । अलक्षा लक्ष गहन ॥
शून्याचें निज शून्य । भांजुनि देखणिया ॥ २६ ॥
प्रणवपदीचिया बोळि । अव्यक्त मांडणि आळि ॥
ते चारि शून्यें पुसिलिं । या बोलि गे माय ॥ २७ ॥
आतां न बोलोनि बोलें । हे धवलें पत्र आलें ॥
धवल्या धामिं उगवलें । धवलेंसिं गे माय ॥ २८ ॥
धवालिया बोलि । धवालिया बोलि ॥
धवलि धवलाचपालि । हें गुरु देखणि ॥ २९ ॥
आतां शब्द निशब्द बोभाट । या टाकिलें परतट
निवृत्ति कर सुभट । खेळतसे ॥ ३० ॥
जेथें तेथें नवा नवरस । हा दाहावां देह सुरस ॥
निवृत्ति राजहंस । येकादश गे माय ॥ ३१ ॥

हंसाचा हंस । करुनि निरास ॥
परापर सुरस । त्या आंतु वेगें ॥ ३१ ॥
अनाक्षरि वोवाळिला । हेतु निरहेतु केला ॥
लेख उल्लेख सारिला । अलक्षा परि ॥ ३३ ॥
अलक्षा लक्ष । ऐसें हें परोक्ष ॥
दिक्षाटलेंसे दक्ष । रक्षणालागि ॥ ३४ ॥
या गैनिनाथें वह्नि । मंगल धाम वोलल्लि ॥
निवृत्ति राजें आणिलि । देखणि लेखनि ॥ ३५ ॥
उमानाथें पत्रिका । शुद्धबुद्ध श्वेतका ॥
पाठिं पोटिं घोटिका । देखनि यानें ॥ ३६ ॥
आदिनाथें पाहिली । सिकेवलिलाविली ॥
अव्यक्त मुद्रिका केली । गोजरि गे माय ॥ ३७ ॥
निज मुद्रिका केलि । परिसि जो नाहिं दिधलि ॥
मुद्रे सत्ता आली । आदिनार्थि ॥ ३८ ॥
अनंग निजमुद्रिका । या पत्रि उमटालि देखा ॥
हा आदिनाथिं सिका । केला गे माये ॥ ३९ ॥
गैनिचा हात । धरित मत्स्येंद्रनाथ ॥
हे पत्रिका सुरू होत । तिये ठाईं ॥ ४० ॥
ऐसि सुरू जालि । सुरु करुनि पाहिली ॥
तंव पाहणें पाहूं आलि । पाहातिया माजि ॥ ४१ ॥
सहज मत्स्येंद्रनाथें । पाविलि गोरक्षितें ॥
हें निशाण निजाचें तें । करुनि वाचवी ॥ ४२ ॥
मग या गोरक्षिकरें । हा गयनि पंथें उत्तरे ॥
सहज मोहरि मोहरे । निवृत्तिवरि ॥ ४३ ॥
निवृत्ति उफराटी । पत्रिका करुनि उलटीं ॥
ज्ञानया समसाटि । अंवणें माये ॥ ४४ ॥
सहज ज्ञाननाथ । मुक्ताईस दावित ॥
सोपानास म्हणत । वाचूं ये बा ॥ ४५ ॥
अनिर्वाच्य वाची । हे पुरवणि विनतीचि ॥
ऐसिया पत्रिकेचि । मातरया ॥ ४६ ॥
हे विनती किं विनता । ना अनिर्वाच विनविता ॥
अगमागम्य डोळा घालितां । हे विनति नव्हे ॥ ४७ ॥

अव्यक्ताचिये चौकिवरी । हे पत्रिका ठेविली ऐसिया परी ॥
मुक्ताई म्हणे वाचुं सारी । न करउं स्वारि जनासि ॥ ४८ ॥
जनवन निरंजन । समासि केलें ऐसें ज्ञान ॥
हें गुरू देखणीचें लेखण । जालें गे माये ॥ ४९ ॥
गर्जोनि निवृत्ति ज्ञाननाथ । मुक्ताबाईसि बोलणें वाचित ॥
हें पत्र प्रतिष्ठानीं एकनाथ । वाचिल वो माये ॥ ५० ॥
ये देखणिचे लेखणि । मनास एकनाथ आणि ॥
तया वाचुनि कोणी । न वाचि वो माय ॥ ५१ ॥
सर्वांगें जो देखणा । तो पावेल या खुणा ॥
त्यामुखें श्रवणा । करणें वो माये ॥ ५२ ॥
स्वतिश्री विजयश्री । या टाकिल्या निवृत्तितीरीं ।
ते हे पत्रिका सारि । लिहि डोलां ॥ ५३ ॥
हें अगम्य कल्याणपत्र । ऐसि निरखणि अनंगाचे नेत्र ।
वाचितया मंगलधाम स्वतंत्र । अर्पिलें वो माय ॥ ५४ ॥
इति ज्ञानेश्वर विरचित पत्रिका ॥ संपूर्ण ॥

या पत्राची एकच प्रत मला मिळाल्याकारणानें मीं ती जशीच्या तशीच छापली. हींत अर्थातच अशुद्धें फार आहेत. परंतु एकनाथाच्या संबंधाचा जो शेवटीं उल्लेख आहे, त्या उल्लेखामुळें कोणीही विवेचक बुद्धीचा गृहस्थ हें पत्र ज्ञानेश्वरमहाराजांचें नाहीं असेंच म्हणणार. या आत्म पत्राची भाषा अगदीं ज्ञानेश्वरीसारखी आहे. यामुळें माझ्या बुद्धीला असें वाटतें कीं, हें मूळ पत्र ज्ञानेश्वराचें असावें, परंतु कोण्या भाविकास तें लाभलें तेव्हां त्याचे मनांत कांहीं तरी येऊन त्यानें शेवटल्या कांहीं ओंव्या आंत दडपून देऊन एकनाथ महाराज हें पत्र वाचतील वगैरे मजकूर त्यांत ग्रथित केला. अशी गोष्ट होणें केवळ नवीन आहे असें नाहीं. भारद्वाज व भिंगारकरबोआ या दोघांच्या वादाचे वेळीं भिंगारकर बोआनीं या ज्ञानेश्वरमहाराजांची गुरुपरंपरा ठरविण्याला जे अनेक आधार दिले आहेत, त्यांत ज्ञानेश्वरांचा दस्तुरखुद्द आधार म्हणून या पत्रांतील ओंव्या दिल्या आहेत. परंतु ज्या पत्रांत ज्ञानेश्वराचे पश्चात् ३०० वर्षांनीं झालेल्या एकनाथ महाराजांचे नांवाचा स्पष्ट उल्लेख आहे, तें पत्र ज्ञानेश्वर महाराजांचें दस्तुरखुद्द म्हणून कसें समजतां येणार ! भिंगारकरबोआंजवळच्या या स्वात्मपत्राच्या प्रतींत या एकनाथाच्या उल्लेखाच्या ओंव्या नसल्या, तर सांगवत नाहीं. परंतु तसें संभवत नाहीं. कारण माझ्या प्रतींत फक्त ५४ ओंव्या असून त्यांत तो उल्लेख आहे. आणि त्यांच्या प्रतींत १०८ ओंव्या आहेत; असें त्यांनीं लिहिलें आहे. तेव्हां त्यांत असण्याचा विशेष संभव आहे; परंतु तसा उल्लेख असल्याबद्दल त्यांनीं लिहिलेलें

आठवत नाहीं. एकनाथाच्या उल्लेखामुळें त्यांच्या मुख्य मुद्यांपैकीं मोठाच मुद्दा गळाला असें म्हणण्यास काय हरकत आहे ! या स्वात्मपत्रांतही श्रीविठ्ठलाचें नांव नाहीं. " उमानाथ " आहे हेंही ध्यानांत घेण्याजोगें आहे.

ज्ञानेश्वराचें नमन हा ग्रंथ १०८ ओंव्यांचा आहे. यांत देव, ब्रह्म इत्यादिकांना नमन आहे. यांत कोठेंच गुरुपरंपरा दिलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर,

**श्री गुरुकृपा जैं होय । तैं नमनाचि ऐसि सोय ॥**
**पावोनियां सुगम उपाय । नमोनमःते ॥**

असा प्रस्ताव केला असून गुरूचें नांव नाहीं. एक वार " श्री निवृत्ति " हें नांव आलें आहे. ती ओवी अशीः—

**नमन लटिकें नव्हे नव्हे । नमन भलतिया न साहे ।**
**जैं साहे सखा होये । श्रीनिवृत्ति ॥**

परंतु निवृत्ति हा शब्द येथें नुसता ' मोक्ष ' या अर्थींच योजिला नाहीं असें म्हणण्याला, कारण नाहीं. आणखीही एक गोष्ट या नमनांत विशेष आहे, ती ही कीं " बाप रखुमादेवी वरू " व "उभा राहोनि स्वयंभू भिमातटीं पंढरिये" असा जो " पुंडरिक निधान पांडुरंग " " श्रीविठ्ठल " त्याचें नांव स्पष्टपणें आहे. मुक्ताबाई, सोपान वगैरे कोणाचेंही नांव त्यांत नाहीं. तेव्हां जर पुढेंमागें दोन ज्ञानदेव ठरले, तर हें नमन संत ज्ञानदेवाचें आहे असें ठरणार, यांत संशय नाहीं. हें नमन मोठें असल्यामुळें मी समग्र वाचीत नाहीं. आणि आतां सांगितलें त्यापेक्षां त्यांत विशेष कांहीं नाहींही.

ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, अभंग, स्वात्मपत्र, नमन या पांच लहानमोठ्या ग्रंथांखेरीज मला ज्ञानेश्वराचे दुसरे कोणतेही ग्रंथ अजून पहावयाला सांपडले नाहींत. तेव्हां त्यासंबंधानें विशेष कांहीं सांगत नाहीं. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथ संबंधानें वाङ्मय दृष्टीनें जें काय मला वाटतें, तें हा ऐतिहासिक विचार झाल्यानंतर सर्व कवींच्या गुणांचें तारतम्य सांगतांना बोलेन. सध्यां पुनः एकदां एवढेंच सांगतों कीं, मराठी भाषेंतल्या सर्व ग्रंथांत या ज्ञानेश्वरी ग्रंथास अगदीं आद्य पदवी आजपर्यंत दिली आहे ती सर्वथा यथार्थ आहे.

ज्ञानेश्वराच्याच कालीं कांहीं वर्षे अलीकडे पलीकडे आणखीही कांहीं दुसऱ्या प्रतीचे परंतु भक्तिरसानें अगदीं ओथंबलेले असे ग्रंथकार व भगवद्भक्त होऊन गेले, त्यांनीं भक्तिरसपरिपूर्ण असे अभंग किंवा ओंवी या वृत्तांत लिहिलेले लहानमोठे ग्रंथ आहेत.

याच कालीं विसोबा खेचर, बंका, सावत्या माळी, चोखामेळा, वगैरे मंडळी होती. या सर्वांचे अभंग, पदें, ओव्या वगैरे सर्व खरोखर वाचण्यालायक आहेत त्यांचे

जर गाथे निघतील तर फार चांगलें होईल. याच काळाचा फार मोठा विशेष हा कीं, त्यांत तीन फार मोठाल्या

### स्त्री कवयित्री

झाल्या. नामदेवाच्या घरच्या राजाई गोणाईनीं कांहीं अभंग केले आहेत इतकेंच नव्हे, तर त्यांचे घरीं जनी म्हणून एक दासी होती, तिनें फार सुरस, भक्तिसुधेने तुडुंब भरलेले व वेदांतानें रसरसलेले असे अभंग किती तरी लिहिले आहेत. ते नामदेवाच्या गाथ्यांत कांहीं आढळतात, परंतु जर खूप शोध केला तर आणखी किती तरी सांपडले पाहिजेत.

ज्ञानेश्वराची बहीण मुक्ताबाई हिचीही कांहीं कविता उपलब्ध आहे, तीवरून पहातां तिच्या समग्र कविता एकत्र करणें खचित श्रेयस्कर होईल असेंच वाटतें. त्याच काळीं तिसरी कवयित्री झाली ती अत्यंत हीन जातींतली होती; परंतु अंतःस्फूर्ति ज्यास होते त्याचें लिंग, वय किंवा जाति कांहीं जरी असलें तरी तें मनांत येत नाहीं. अंतःस्फूर्तीच्या बोलाचें कौतुक आपोआपच आपल्या तोंडून होतें. चोखामेळा व त्याची भक्तिमती पत्नी या दोघांनींही अभंग रचिले. त्यांत त्या ' चोखयाच्या महारी ' च्या अभंगवाणीचा एकच मासला आपल्या पुढें ठेवितों.

**देहासि विटाळ । म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ । शुद्धबुद्ध ॥१॥**<br>
**विटाळावांचून । उत्पत्तीचें स्थान । कोण देह निर्माण । नाहीं जगीं॥२॥**<br>
**देहाचा विटाळ । देहींच निर्धारीं । म्हणतसे महारी । चोखयाची ॥ ३ ॥**

जातीची महारीण असून अशा तऱ्हेचें सहजोद्‌बुद्ध ज्ञान जिच्या ठायीं जागृत झालें, व तसें ज्ञान न झाल्याकारणानें जे कर्मठ ' विटाळ होईल दूर हो ' ' विटाळ होईल दूर हो ' ' तुझी छायासुद्धां पडतां कामा नये. ' असें तुसडून म्हणून तिला दूर सारीत असतील, त्यांची कींव येऊन किंवा त्यांच्याबद्दल मनाला विषाद वाटून वरील तऱ्हेचे उद्गार तिच्या तोंडून निघाले असले तर त्यांत नवल काय ! हा अभंग वाचून मला असेंच वाटलें, कीं ज्या जातींत अशा तऱ्हेचें रत्न उत्पन्न झालें त्या जातीला आमच्या वेडगळ समजुतीनें व दुराग्रहानें आम्हीं नेहमीं दडपून ठेवूं पहाणें हें अगदीं गैरशिस्त होय.

## एकनाथ.

शके १२०० पासून तों १५०० पर्यंतचा हा काळ केवळ भक्तिपर, किंवा वेदांतपर ग्रंथ रचण्यांत गेला. या काळांत पुराणांचें भाषांतर किंवा त्यांतील कथांचें अनुसंधान धरून रचिलेलें काव्य झालेलें आढळत नाहीं. एक नामदेवाच्या नांवावर असलेलें महाभारत आहे. परंतु तें गाथाकार नामदेवाचेंच होय, असें

अद्यापि ठरलें नाहीं. तेव्हां तें या काळांत धरूं नये असें वाटतें. १५४८ त एकनाथ अवतीर्ण झाले. हे जनार्दनस्वामींचे शिष्य. जनार्दनस्वामींचेही बरेच अभंग वगैरे आहेत. परंतु त्यांच्या या सच्छिष्यानें त्यांस मागें सारलें. एकनाथमहाराजांचा काळ सरासरीनें १५४८ ते १६०९ पर्यंत होता. यांनीं आपल्या आयुःक्रमांत दोन फारच मोठीं कार्यें केलीं. त्यांत अव्वल प्रतीचें कार्य म्हणजे ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार व प्रचार केला हें होय. आणि त्यांनीं स्वतः रामायण व भागवत यांवर ग्रंथ लिहिले हें त्यांचें दुसरें कार्य होय. ज्ञानेश्वरी ग्रंथ अत्यंत उत्तम असून त्याचा प्रचार जितका व्हावयास पाहिजे तितका होत नाहीं हें पाहून त्यांस अत्यंत वाईट वाटलें आणि त्यांनीं त्या ग्रंथाच्या पोथ्या जमवून पाहिल्या तों त्या अत्यंत अशुद्ध. तेव्हां त्या शुद्ध करून ज्ञानेश्वरीची एक शुद्ध प्रत तयार केली. हा त्यांनीं महाराष्ट्रावर केवढा थोरला तरी उपकार करून ठेवला. माझ्या मतीला तर असें वाटतें कीं, एवढें एकच काम एकनाथांनीं केलें असतें, आणखी दुसरें कांहींही केलें नसतें, तरी एकनाथांची कीर्ति महाराष्ट्रांत अजरामर झाली असती. परंतु त्यांनीं तेवढेंच केलें नाहीं. त्यांनीं स्वतःही फार सुंदर अशी ग्रंथरचना केली आहे.

१ भागवत. २ भावार्थरामायण. ३ आनंदलहरी. ४ हस्तामलक. ५ रुक्मिणीस्वयंवर. ६ स्वात्मसुख. ७ पदें व अभंग. ( गाथा. )

हे ग्रंथ त्यांनीं केले आहेत. संस्कृत पुराणें घेऊन त्यांतील कथांवरून मराठींत ग्रंथ लिहिण्याला सुरुवात नाथांनींच केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. महानुभाव ग्रंथकार कवीश्वर व हयग्रीव यांनीं मात्र भागवताच्या दशम व एकादश स्कंदांवर नाथांच्या फार पूर्वी ग्रंथ लिहिलेले दिसतात. परंतु ज्ञानेश्वरापासून नाथांपर्यंत सर्व स्त्रीपुरुष ग्रंथकारांचा भर वेदांत व भक्ति यांवरच होता. त्याला नाथांनीं थोडेंसें भिन्न वळण दिलें. त्यांनीं रामायण व भागवत या ग्रंथांच्या आधारानें मराठींत ग्रंथ लिहिले. अर्थात् मूळ वळण वेदांत व भक्तिपर ग्रंथांचेंच राहून हे ग्रंथ लिहिले गेले हें उघड आहे. परंतु नुसतीं प्रमेयें घेऊन त्यावर अनेकविध दृष्टांतांनीं खल करण्यापेक्षां हें निराळें स्वरूप होतें. त्याचप्रमाणें नानाप्रकारांनीं परमेश्वराच्या भक्तीचें महत्त्व मनुष्याच्या मनावर ठसविण्याचाही हा एक निराळा प्रकार होता. एकनाथी भागवत म्हणजे एक खरोखरच अजब ग्रंथ आहे, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. त्याचा अभ्यास वाङ्मय या दृष्टीनें करणें अत्यंत अवश्य आहे.

नाथांच्या समकालीनांत प्रमुख प्रमुख म्हटले म्हणजे पहिल्यानें दासोपंत. यांनीं एक गीतेवर टीका केलेली आहे. त्याचप्रमाणें मृत्युंजयस्वामी व शिवरामस्वामी हे होत. या दोन्ही कवींच्या स्फुट कवितांखेरिज मोठें कांहीं काव्य कोठें पहाण्यांत किंवा ऐकिवांत नाहीं.

# मुक्तेश्वर.

जें काम एकनाथांनीं आरंभलें तें त्यांचा नातू ( मुलीचा मुलगा ) मुक्तेश्वर यानें पूर्णतेस नेण्याचा फार सुंदर यत्न केला. परंतु याची वृत्ति निव्वळ विचार-सौंदर्य, कल्पनाविशालत्व व भाषाप्रागल्भ्य या तीन गुणांकडेच होती. वेदांत किंवा भक्ति ही त्याच्या ग्रंथांत तितक्या म्हणजे याच्या पूर्वींच्या ग्रंथ-कारांच्या ग्रंथांत जितक्या प्रमाणानें भरलेली होती तितक्या प्रमाणानें भर-लेली नाहीं. परंतु ज्यास आपण साधारणतः कवित्व म्हणतों, तें मात्र यांच्या महाभा-रतांत नुसतें तुडुंब भरलेलें आहे, यांच्या भारतांतील सृष्टिवर्णनें तर कित्येक वेळां ते ते देखावे आपल्या दृष्टीसमोर स्पष्टपणें आणून उभेच करितात. यांची कथाकथन-शैली फार अप्रतिम. यांचें स्वभाववर्णन अत्यंत सुंदर. दुर्दैवाची गोष्ट हीच आहे कीं, यांचें समग्र महाभारत अद्यापि कोठें सांपडत नाहीं. फक्त चारच पर्वें सांपडलीं आहेत आणि अमुक गृहस्थास समग्र महाभारत सांपडलें आहे, तमुक गृहस्थाजवळ तें आहे अशा गप्पा मात्र पुष्कळच ऐकूं येतात. जीं पर्वें सांपडलीं आहेत तेवढ्यांवरून असें वाटतें, कीं या ग्रंथकाराचा हा समग्र ग्रंथ सांपडल्यास आपणास कवित्वाची एक खाणच सांपडणार आहे. मुक्तेश्वरांनीं ग्रंथ लिहिले तेः

१. महाभारत. २. रामायण. ३. शतमुख रावणवध. ४. वत्सलाहरण. ५. हरिश्चंद्राख्यान.

यांपैकीं हरिश्चंद्राख्यान इतकें सुंदर आहे व करुणरसानें इतकें ओथंबलेलें आहे कीं तें वाचतांना कोणाही वाचकाच्या नेत्रांतून अश्रुपूर वाहिल्याखेरीज राहत नाहीं. मुक्तेश्वर १६०८ त जन्मले असें म्हणतात. त्यांची कविता हृदयकमलाला केवळ सूर्यवत् होय यांत शंका नाहीं.

या मुक्तेश्वरांचा समकालीन असा 'देवी दास' नांवाचा एक कवि झाला. या कवीचें व्यंकटेशस्तोत्र मात्र फार सुप्रसिद्ध आहे. परंतु यानें आणखीही कांहीं ग्रंथ लिहिले आहेत, असें ऐकितों. ते प्रसिद्ध होतील तर बरें होईल. व्यंकटेशस्तोत्र वाचलें नाहीं असा माणूस महाराष्ट्रांत विरळा. ज्याप्रमाणें शनिमाहात्म्य वगैरे पोथ्या नियमानें वाचण्याचा कित्येकांचा परिपाठ असतो, त्याचप्रमाणें व्यंकटेशस्तोत्राचा पाठ करण्या-चीही वहिवाट फार आहे. हें स्तोत्र लहान परंतु मोठें भक्तिरसपूर्ण असल्यामुळें व त्याच्या पाठानें इष्टफलप्राप्ति होते अशी श्रद्धा लोकांत–विशेषतः स्त्रियांत–उत्पन्न झाल्याकारणानें या छोटेखानी स्तोत्राचें माहात्म्य इतर महत्त्वाच्या ग्रंथांपेक्षां किती तरी अधिकपट लोकांत वाढलेलें दिसतें ।

मुक्तेश्वरानंतर महाराष्ट्रांत एक अद्वितीय जोडी झाली. तिनें महाराष्ट्राच्या धार्मिक विचारांवर व महाराष्ट्राच्या संसारावर जो विलक्षण परिणाम केला, त्याचें यथातथ्य वर्णन करून सांगणें आजच्यासारख्या तासाभराच्या व्याख्यानांत दहा पंधरा मिनिटें घेऊन होणें अशक्य; इतकेंच नव्हे, तर त्या जोडीपैकीं एकएकाच्या ग्रंथांवर अशीं पांच पांच व्याख्यानें दिलीं तरीसुद्धां त्यांच्यासंबंधानें सांगावयाचें तितकें सांगून होईल कीं नाहीं याची मला शंकाच वाटते. ही जोडी संतमणि तुकाराम आणि साधुवर्य रामदास यांची होय. या दोघांचेंही जन्मवर्ष जें मुक्तेश्वराचें तेंच, म्हणजे १६०८ च होतें अशी समजूत आहे. साल जणूं काय महाराष्ट्रांत पुरुषरत्नांनां उपजण्याचेंच होतें.

## तुकाराम.

तुकाराममहाराज देहू मुक्कामीं १६०८ जन्मले व १६४९ त निजधामास गेले. तुकाराम जातीचे वाणी परंतु त्यांची वाणी म्हणजे साक्षात् परब्रह्मापासून वेद स्फुटित झाले तेव्हांचीच ती वाणी असें लोकांस वाटूं लागलें होतें. त्यावेळच्या लोकांस असें वाटूं लागून हा अवतारी पुरुष, असा तुकाराममहाराजांचा लौकिक झाला. असें झालें याबद्दल केव्हांही कोणास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. तुकाराममहाराजांची गाथा घेऊन कोणत्याही पानावरील पांच दहा अभंग वाचले, कीं स्वयमुद्भूत कविता कशी असते हें वाचकांच्या प्रत्यक्ष अनुभवाला येणार आहे. एखादें अत्यंत पक्क झालेलें फळ जसें आपोआप फुटून त्यांतील अमृतोपम माधुरी रसरूपानें आपोआप बाहेर पडूं लागते, तद्वत् या महापुरुषाच्या स्फूर्तियुक्त चित्तांत विचारामृताचा अतिरेक होऊन तें अमृतफल भंग पावून अभंगरूपानें आंतील अमृताचा लोट बाहेर पडूं लागला. स्फूर्तिस्फुटित अशा अंतःकरणांतून अत्यंत श्रेष्ठ अशी विचारपंक्ति बाहेर पडली तर त्यांत नवल काय! या वाण्याच्या अभंगरूप बोलांत श्रुतीचे बोल उमटूं लागले. अद्वैतवेदांत केवळ महापंडिताच्या मात्र स्वाधीन, तो लहानसान, हीन दीन पोर सोर व्यक्तीच्या मनावर सुद्धां ठसूं लागण्यास याची कविता कारण झाली. तेव्हां अर्थातच प्रथम प्रथम कर्मठांचें चित्त बावरलें व त्यांनीं तुकाराममहाराजांचा द्वेष मांडला; परंतु ज्याला द्वेष म्हणजे काय पदार्थ होता याचें ज्ञान सुद्धां नाहीं, त्याचा द्वेष लोक किती वेळ करीत राहणार! त्याच्या त्या उपदेशसुधेच्या अलोट प्रवाहांत सगळा महाराष्ट्र बुडून जाऊन कित्येक कर्मठांनीं त्याचें अनुयायित्व पतकरिलें. तुकाराममहाराजांचे ग्रंथ म्हणजे त्यांचे चार पांच हजार अभंग व थोडींशीं पदें इतकेंच होत. परंतु या अभंगांत प्रवृत्ति व निवृत्तिमार्गाचें अगदीं सारसर्वस्व भरून राहिलें आहे.

## रामदास.

तुकाराममहाराज ज्या सालीं जन्मले त्याच सालीं महाराष्ट्रांत गोदावरीच्या उत्तर तीरावर जांब नांवाच्या गांवीं हा दुसरा पुरुष–रामदास–जन्मला. रामदास हे बालब्रह्मचारी व अगदीं बाल्यापासून ईश्वरभक्तिपरायण होते. यांच्या ग्रंथांनीं महाराष्ट्रावर फारच मोठे उपकार करून ठेविले आहेत. त्यांत केवळ धर्मोपदेश नसून, संसारव्यवहारांत असणाऱ्या पुरुषांनींही कसें वागलें असतां इहपरलोकीं आपलें व आपल्या देशबांधवांचें हित सिद्ध होईल हें उत्तम प्रकारें बोधिलें आहे. इतर साधुसंत, कवि आणि रामदासस्वामी यांच्या ग्रंथांत जो मोठा फरक आहे, तो हाच होय, कीं इतर कवींनीं ज्याप्रमाणें व्यवहार सोडून केवळ ईश्वरभक्तिपरायण व्हावें असें लोकांस मोठ्या कंठरवानें सांगितलें आहे त्याप्रमाणें रामदासांनीं आपल्या ग्रंथाच्याद्वारें सांगितलें नाहीं. तर संसारव्यवहारांत राहून तो सर्व व्यवहार उत्तम प्रकारें चालवून त्यांतच परमार्थ साधावा व परमेश्वरभक्ति करावी असा बोध त्यांनीं केला आहे. रामदासस्वामींचा दासबोध म्हणजे केवळ परमार्थाचाच ग्रंथ नव्हे, तर व्यवहारबोधाचाही अत्यंत श्रेष्ठ, भरपूर व अक्षय्य असा सांठा आहे. समर्थांनीं लहान मोठे असे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. परंतु त्या सर्वांत दासबोध हाच फार विस्तृत आणि अत्यंत महत्त्वाचा आहे. मोठें थोरलें ज्ञानभांडारच तें होय. त्याचप्रमाणें त्यांचे मनाचे श्लोक व अभंग हेही फार चांगले आहेत. दासबोधापेक्षांही समर्थांचे मनाचे श्लोक सर्वतोमुखीं झालेले आहेत.

ऐतिहासिक परंपरेनें मुख्यमुख्य कवींची व ग्रंथकारांची थोडीथोडी माहिती देऊन झाली, म्हणजे या व्याख्यानाच्या उत्तरार्धांत तुकाराम व रामदास यांची परस्पर तुलना करून प्रत्येकाचा विशेष काय आहे हें मी सांगणार आहें. तेव्हां सध्यां आतां समर्थांच्या ग्रंथांपैकीं मुख्यमुख्य ग्रंथांचीं नुसतीं नांवें देऊन तुकाराम व समर्थ यांच्या समकालीन ग्रंथकारांच्या व भगवद्भक्तांच्या नांवांचा उल्लेख करून पुढें वामनपंडितांकडे वळूं. रामदासांच्या ग्रंथांत

१ दासबोध. २ पंचसमासी. ३ जुनाटपुरुष. ४ पूर्वारंभ. ५ मनाचे श्लोक. ६ मानसपूजा. ७ निर्गुणध्यान व सगुणध्यान.

हे ग्रंथ विशेष महत्त्वाचे आहेत. मराठी वाङ्मयाचा अभ्यास करूं इच्छिणारानें यांतून १, ३, ५ व ७ एवढीं प्रकारणें तरी अवश्य वाचावीं.

तुकाराममहाराज व समर्थ यांचे समकालीन कवींत रामेश्वरभट्ट, सेना न्हावी, नारायणबोवा, कान्होबा, शेख अहमद, शेखसुलतान, उद्धवचिद्घन व रंगनाथ स्वामी, इतके विशेष नांव घेण्यासारखे ग्रंथकार झाले. त्यांतही सेना न्हावी,

उद्धवचिद्घन व रंगनाथस्वामी हे फार महत्त्वाचे आहेत. सेना न्हाव्याचे अभंग कोठें कोठें आढळतात. उद्धवचिद्घनांनीं साधुचरित्रपर ग्रंथ लिहिले आहेत. त्यांस महाराष्ट्रांतील आद्य चरित्रकार म्हटलें तरी हरकत नाहीं. यांचे आधीं मराठी भाषेंत कोणीं साधूंचीं किंवा दुसऱ्या कोणाचीं चरित्रें लिहिलेलीं अद्यापि ऐकिवांत सुद्धां नाहींत. रंगनाथस्वामींचेही ग्रंथ मोठे बोधपर व भक्तिरसपूर्ण आहेत. हे सर्वच पुरुष महाभगवद्भक्तांपैकीं होत.

आतांपर्यंत महाराष्ट्र मंडळांतले जे कवि सांगितले, हे सर्व केवळ वेदांत, ब्रह्मज्ञान व भक्तिमहात्म्य यांचें वर्णन करून जगाचा उद्धार करूं इच्छिणारेच झाले. केवळ कथामृताचें पान साधारण लोकांस व्हावें, एवढीच इच्छा धरून व तद्द्वारें उपदेश करणारा एकटा काय तो मुक्तेश्वरच होय. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंत जे कविसाधु झाले, त्यांत विद्वत्तेच्या जोरावर आपलें ग्रंथमंदिर बांधून आपली कीर्ति अजरामर करून सोडणार, असा कोणी झाला नाहीं. मुकुंदराज, ज्ञानेश्वर व एकनाथ या तिघांसच संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे, बाकीच्यांना त्या गीर्वाण वाणीचें तितकें ज्ञान नव्हतें यांत शंका नाहीं. त्यांची कवित्वस्फूर्ति अगदीं सहज असल्यामुळें त्यांस त्या संस्कृत भाषाज्ञानाची कांहींच उणीव कधीं भासली नाहीं. तुकाराममहाराजांना संस्कृत येत असेल असें वाटत नाहीं. परंतु त्यांच्या नांवानें मोडणारे असे भगवद्गीतेवर अभंग आहेत, ते जर खरोखर त्यांचेच असतील तर त्यांसही थोडें संस्कृताचें ज्ञान असण्याचा संभव आहे. परंतु वामन पंडित हा मूळचा महापंडित, श्रुतिस्मृति, पुराणेतिहास, तर्कालंकार, व द्वैताद्वैत वेदांत त्याचप्रमाणें व्याकरणशास्त्र, आणि न्यायादिशास्त्रें त्यांस पूर्णपणें अवगत असलीं पाहिजेत असें दिसतें. या कवीनें एकंदर पंचवीस तीस ग्रंथ लिहिले आहेत. त्यांतील मुख्य ग्रंथांची यादी आपणास वाचून दाखवितों.

१. यथार्थदीपिका. २. राजयोग. ३. श्रुतिकल्पलता. ४. ब्रह्मस्तुति. ५. अपरोक्षानुभूति. ६. निगमसार. ७. अनुभूतिलेश. ८. गीतार्णवसुधा.

हे आठ ग्रंथ केवळ वेदांतपर आहेत व फार गहन आहेत. कित्येक तर संस्कृतच आहेत. या ग्रंथांवरून वामन पंडित किती विद्वान् होते हें अगदीं स्पष्टपणें समजून येतें. परंतु पंडितांची लोकांत जी कीर्ति आहे, ती यांच्या या वेदांतपर ग्रंथांमुळें नव्हे तर,

१. राधाभुजंग. २. भामाविलास. ३. रासक्रीडा. ४. कात्यायनीव्रत. इत्यादि शृंगारपूर्ण काव्यांमुळें व

१. भीष्मप्रतिज्ञा. २. सीतास्वयंवर. ३. कालियामर्दन.

इत्यादि कथानकांवरील काव्यांमुळें झालेली आहे. यांची यथार्थदीपिका, ज्ञानेश्वरमहाराजांच्या भावार्थदीपिकेच्या तोडीची गीतेवर टीका करावी, किंबहुना तिला आपल्या टीकेनें मागें सारावें या बुद्धीनें वामनपंडितांनीं ही लिहिली असावी असें वाटण्यास जागा आहे. पंडितांच्या पूर्वी भगवद्गीतेवर काय त्या दोनच टीका. १ ज्ञानेश्वरमहाराजांची भावार्थदीपिका आणि २ री पैठणकर रंगनाथांची चित्सदानंदलहरी; पैकीं दुसरी कोणाच्या विशेष पाहण्यांत किंवा भाषणांतसुद्धां येत नाहीं. मीही अद्यापि पाहिली नाहीं. परंतु ज्ञानेश्वरीची कीर्ति फार. तिचा अभिमान बाळगणारेही फार. तेव्हां आपली यथार्थदीपिका झाल्यानंतर ज्ञानेश्वरी मागें पडेल अशा पंडितांच्या समजुतीला धक्का बसेल अशाच तऱ्हेचें त्या यथार्थदीपिकेला लोकांनीं स्वागत दिलें असावें असें दिसतें. कारण, पंडितांनीं आपल्या यथार्थदीपिकेंत पुढील उद्गार काढले आहेतः—

**ज्यांस इतर टीकाकारांचे अभिमान ।**
**ते न देतील या टीकेस मान ॥**

ज्ञानेश्वरांच्या टीकेचा अभिमान बाळगणारांनाच अनुलक्षून पंडितांनीं अशा तऱ्हेचे उद्गार काढले आहेत यांत शंका नाहीं. परंतु या व्याख्यानाच्या शेवटच्या भागांत कित्येक कवींच्या तारतम्यभावाबद्दल मी बोलणार आहें, तेव्हां मी ज्ञानेश्वर व वामन यांची—गीतेचे टीकाकार या नात्यानें तुलना करीन.

याच सुमारास जयरामस्वामी झाले. यांचा समाधिकाल १६७२ आहे. यांनीं सीतास्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, अशीं दोन काव्यें लिहिलीं आहेत.

## रघुनाथ पंडितांचा राजव्यवहार कोश.

या सुमारास झालेल्या एका लहानशा, परंतु अत्यंत महत्त्वाच्या पुस्तकासंबंधानें चार शब्द बोलल्यासेरीज हें व्याख्यान खरोखर ओकें दिसेल. हें पुस्तक म्हणजे राजव्यवहार कोश होय. हा कोश फार लहान आहे. अमरकोशाच्या एखाद्या मोठ्याशा वर्गाएवढा सुद्धां असेल नसेल. परंतु तो झाला त्या काळच्या लोकांच्या अंतःकरणस्थितीची साक्ष त्या कोशापासून फारच उत्कृष्ट तऱ्हेनें पटते. शिवाजीमहाराजांनीं स्वराज्य स्थापन केलें, तें केवळ देशापुरतेंच असावें अशी त्यांची मनीषा नव्हती. तर आपल्या भाषेच्याही बाबतींत स्वराज्य स्थापन करावें अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्या चित्तांत जागृत होती. राज्यकारभारासंबंधानें प्रचाराव्यवहारांत असणारे बहुतेक पारिभाषिक शब्द व अधिकाऱ्यांच्या पदव्याही फारसी भाषेत होत्या. किल्ले, परगणे, वगैरे सर्व संबंधांतले व्यावहारिक शब्द फारसी. कागदोपत्रीं व पत्रव्यवहारांत फारसी शब्दांची योजना बहुत, हा प्रकार महाराजांस मुळीं खपेना. ज्याप्रमाणें देशावर त्याचप्रमाणें भाषेवरही आपलें स्वराज्य स्थापन करून सर्व फारसी शब्दांस

टाकून दऊन त्यांच्या ऐवजीं संस्कृत शब्दांची योजना करण्याची अत्यंत प्रशंसनीय बुद्धि त्यांस सुचली. आणि ती बुद्धि होताक्षणींच, त्यांनीं आपल्या पदरच्या एका सुप्रसिद्ध पंडितास हा राजव्यवहार कोश तयार करण्यास सांगितलें. राजद्वारीं किंवा राजकीय संबंधांत जे कांहीं फारसी शब्द रूढ झालेले असतील, ते सर्व काढून टाकून त्यांच्याऐवजीं संस्कृत शब्द घालावयाचे आणि कोश तयार करावयाचा व तो तयार झाला म्हणजे स्वराज्यांत जिकडे तिकडे—राजद्वारीं व पत्रव्यवहारांत आणि भाषणादिकांतहि—त्या कोशांत सांगितलेले सर्व संस्कृत शब्द योजिले जावे, अशी महाराजांची आज्ञाही झाली. परंतु ती सर्वथा सिद्ध झाली नाहीं. आणि महाराजही पुढें थोडयाच अवधींत वैकुंठवासी झाले, हें महाराष्ट्राचें मोठें दुर्दैव. या कोशाची उत्पत्तिही अशी मोठ्या ऐतिहासिक महत्त्वाची आहे. तेव्हां महाराष्ट्र वाङ्मयाच्या मंदिरांत त्याला कोठें तरी प्रमुख असें स्थान दिल्यास वावगें नाहीं.

## श्रीधर.

यानंतर नांव घेण्याजोगा कवि म्हणजे शिवलीलामृताचा कर्ता श्रीधर होय. याचा काळ १६७८ ते १७२८. जें मुक्तेश्वरांनीं आरंभिलें, तेंच यांनीं पुढें चालविलें. परंतु मुक्तेश्वरांचें कवित्व यांच्या ग्रंथांत नाहीं. तथापि यांचे ग्रंथ मराठी वाङ्मय या दृष्टीनें चांगले महत्त्वाचे व मूल्यवान् आहते, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. यांचे ग्रंथ मुख्यतः

१ शिवलीलामृत. २ हरिविजय. ३ रामविजय. ४ पांडवप्रताप. ५ ब्रह्मोत्तरखंड. ६ जैमिनीअश्वमेध.

यांत पहिले चार फार प्रसिद्ध आहेत आणि त्यांतही पहिला ग्रंथ तर अगदीं फारच लोकप्रिय आहे. त्यांतील शिवरात्रि कथा व सीमंतिनीची कथा या दोन कथा तरी प्रत्येकानें वाचाव्या. श्रीधराची भाषा सोपी, सरळ व शुद्ध असते. त्यांत विलक्षण सृष्टिवर्णन किंवा दृष्टांत, उपमा, रूपक वगैरे अलंकारांची रेलचेल, किंवा कल्पनाशक्तीच्या विलक्षण भराऱ्या हें कांहीं विशेष सांपडावयाचें नाहीं, परंतु त्याचीं वर्णनें सुंदर आणि डोळ्यापुढें चित्रें उभीं करणारीं आहेत यांत शंका नाहीं. शिवरात्रि कथेच्या अध्यायांत तो व्याध बिल्ववृक्षावर चढून बसल्यापासून तों मृग, मृगी पुनः त्याच्यापुढें येईपर्यंत सर्व प्रकार इतका चित्तवेधक केला आहे कीं लहान पोरांपासून थोरांपर्यंत सर्वांस मोठें कौतुक वाटल्यासेरीज राहणारच नाहीं. श्रीधराचे हरीविजय, रामविजय व पांडवप्रताप हे तीन ग्रंथही लौकिकांत चांगले

प्रसिद्ध आहेत, आणि त्यांतही कित्येक प्रसंग फार सुंदर आहेत, ते मुळांतून अवश्य वाचावे. श्रीधराच्या सर्व ग्रंथांतून सुंदर उतारे घेऊन जर कोणीं पुस्तक केलें तर तें वाचनीय होईल.

## रघुनाथ पंडित.

रघुनाथ पंडित हा कवि याच सुमारास झाला. याचें काय तें एकच काव्य उपलब्ध व सुप्रसिद्ध आहे. तें नलदमयंती आख्यान होय. याची कथाकथनशैली फार सुंदर व संस्कृतांतील काव्यांच्या धर्तीवर आहे. रघुनाथ पंडिताच्या पूर्वीचे नामांकित कवि महाभारतादिकांना धरून धरून आपल्या प्रतिभेला उड्डाण करण्यास लावीत, परंतु या कवीनें संस्कृत काव्यांप्रमाणें कथेचा मात्र आधार धरून आपली कल्पना बरीच उपयोजून काव्यरचना करण्याचा प्रयत्न केला व तो फार उत्तम वठला यांत शंका नाही. नलदमयंती आख्यान लहानसेंच परंतु फार प्रशंसनीय व हृदयंगम आहे. कवीनें श्रीहर्षाचें नैषध पठित केलें होतें अशाबद्दल या काव्यांत जरी साक्ष सांपडली तरी त्याचें स्वत्वही त्यांत अनेकविध प्रसंगीं दृगोचर होतें. या काव्याची भाषा सुंदर, भारदस्त व हृदयंगम आहे. वृत्तें अनेकविध आहेत आणि एकंदरींत विविध रसांचा परिपोष करून मराठी भाषेंतही संस्कृताच्या तोडीचीं काव्यें लिहितां येतील, हें या कवीनें महाराष्ट्रजनांच्या फार चांगलें निदर्शनास आणिलें.

## महिपति.

रघुनाथ पंडितापर्यंतच्या कवींनीं वेदांतपर किंवा महाभारतांतील कथांच्या आधारानें भगवंतावर किंवा प्राक्कालीन भगवद्भक्तांच्या कथांवर किंवा वीरांच्या कथांवर काव्यें लिहिलीं, परंतु १७१५ च्या सुमारास एक कवि जन्मला त्यानें आपल्या काव्यकर्तृत्वाला एक नवाच प्रदेश शोधून काढला. अर्वाचीन काळीं जे थोर थोर भगवद्भक्त झाले, त्यांच्या नामसंकीर्तनाचा व चरित्रलेखनाचा महिमा पांडवांसारख्या प्राचीन भगवद्भक्तांच्या चरित्रलेखनाच्या महिम्यापेक्षां मुळींच कमी नाहीं. त्यांचीं चरित्रें तितकींच पुण्यप्रद, बोधप्रद व रमणीय आहेत असें महिपतिबावानीं जगास दाखवून दिलें. यांचे ग्रंथ.

१ संतविजय. २ संतलीलामृत. ३ भक्तिविजय. ४ भक्तिलीलामृत. ५ तुकारामचरित्र. ६ कथासारामृत.

हे–निदान यांतले पहिले पांच फार सुप्रसिद्ध आहेत. महिपतिबावांच्या ग्रंथांचा अभ्यास, ते मराठींतले कालानुरोधानें दुसरे, परंतु योग्यतेनें व शोधकपणानें पहिले संतचरित्रकार या दृष्टीनेंही, केल्यास त्यापासून फार हित आहे. महिपतिबावांच्यापूर्वीं फक्त उद्धवचिद्घनांनींच अशा प्रकारचा प्रयत्न केलेला होता. महिप-

तिबावांचीं चरित्रें फार प्रेमळ, भक्तिरसपूर्ण व सुंदर आहेत. यांचे तुकारामाचे चरित्रासारखीं पुस्तकें शाळांतील मुलांस कां शिकविलीं जाऊं नयेत हें समजत नाहीं. यांची भाषाही शुद्ध असते. नीट संशोधन करून जर हीं पुस्तकें छापविलीं, तर इंग्रजीत पोपचें ईलिअड किंवा चासरच्या गोष्टी वाचल्या जातात, त्याप्रमाणें मराठींत यांचें वाचन वाङ्मय दृष्टीनें उपयुक्त होऊन शिवाय नित्युपदेशदृष्टीनेंही हितावह होणार आहे, यांत संशय नाहीं.

## मोरोपंत.

महिपतीच्यानंतर ज्या कविवराच्या ग्रंथांचा उल्लेख करावयाचा तो कवि मोरोपंत होय. मोरोपंताचा ग्रंथ अपरिमित आहे म्हटलें तरी चालेल. त्याच्या अखंड लेखणींतून ग्रंथांचा जणूं काय प्रचंड प्रवाह एकसारखा वाहातच होता. तो अजस्र प्रवाह पाहिल्याबरोबरच प्रेक्षकांची दृष्टि अगदीं चकित होऊन जाते. ज्याप्रमाणें पर्वताच्या पायथ्याजवळच्या सपाट प्रदेशावर उभें राहिलें असतां त्या पर्वतावरून वाहत येणाऱ्या महानदीच्या धोताकडे व तो धोत खालीं येऊन पडल्यावर त्या सर्व प्रदेशावर पसरल्यानंतर, त्या जलमय विस्ताराकडे पाहिलें असतां प्रेक्षकाच्या मनाची जशी स्थिति होते तशीच स्थिति बारामतीकर मोरोपंताचे कविताग्रंथ पाहून वाचकांच्या मनाची होते. महानदीच्या जलप्रवाहाप्रमाणेंच मोरोपंताच्या ग्रंथांचा प्रवाह होय यांत शंका नाहीं. त्यांनीं सबंध महाभारत आर्याबद्ध केलें. नानाप्रकारांनीं-शेंकडों प्रकारांनीं--रामायण गाईलें, अनेक स्तोत्रें रचिलीं, साधुसंतांच्या गुणांचें कथन केलें, परमेश्वरस्तुतिपर काव्यें लिहिलीं, भगवद्भक्तांच्या महिम्यांचीं वर्णनें केलीं, अनेक देवतांचें नामसंकीर्तन केलें, विष्णुसहस्र, दूर्वासहस्र, वगैरे आर्यासहस्रकेंही बांधिलीं; सन्मणिमाला ग्रथिल्या--सारांश जो विषय म्हणून पद्यबद्ध करणें त्यांस शक्य वाटलें, तो विषय मोठ्या चातुर्यानें व सहजतेनें त्यांनीं पद्यबद्ध केला. या त्यांच्या ग्रंथांत किती चित्रकाव्यें, किती अलंकार, किती शब्दचमत्कृति हीं आलीं आहेत, याची मोजदाद करणें म्हणजे एखाद्या महानदींत किती वालुकाकण आहेत हें मोजूं जाण्यासारखेंच होणार आहे. पंतांची मराठी भाषा फार प्रौढ, निर्मल, प्रायः सरल व अनेकविध अलंकारांनीं केवळ नटलेली अशी आहे. या अलंकारांच्यामुळें तिचें स्वरूप विशेष खुलून दिसतें यांत शंका नाहीं. तिची मनोहरता अव्याज मनोहरता नाहीं एवढें मात्र म्हटल्याखेरीज राहवत नाहीं. पंतांची रचनाशक्ति फार दांडगी हें सांगावयास नको. संस्कृत भाषेचें ज्ञान फार चांगलें असल्यामुळें शब्दचमत्कृति करण्यास शब्दांचा भरणा फार मोठा. पंत मूळचे केवळ कारकून, परंतु एकवार यजमानांच्या हितपर परंतु मर्मच्छेदक भाषणामुळें उपरति होऊन काव्यरचनेकडे लागलेली प्रतिभा सगळ्या शब्दसृष्टींत स्वेच्छ संचार करू

लागून तिनें असंख्य व विविध चमत्कार उपजविले. पंत कवि होते कीं नुसत पद्यग्रंथ लिहिणारे होते हा एक वाद फार वर्षांपूर्वीं उत्पन्न होऊन त्याचें कै. गुरु. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं अगदीं यथास्थितपणें खंडण केलें असें पुष्कळांचें मत आहे. पंतांच्या इतक्या जगद्विस्तृत ग्रंथसंग्रहांत काव्यत्व मुळींच नाहीं असें प्रतिपादन करण्याचें धाष्टर्य कधींच कोणी करणार नाहीं. त्यांच्या ग्रंथांच्या विस्ताराच्या मानानें त्यांच्या ग्रंथांतून काव्यपरिपोष झाला आहे कीं काय हें पाहूं गेलें असतां काय निदर्शनास येतें याचा विचार केला म्हणजे मात्र त्या वादाला अगदीं निराधारच म्हणतां येईल कीं नाहीं याची शंका आहे. मला स्वतःला काय वाटतें याबद्दल आतां थोड्याच वेळानें सर्व वाङ्मयाचें सिंहावलोकन करून मुख्य मुख्य कवींच्या गुणांचा तारतम्यभाव पाहतांना सांगेन. पंतांच्या काव्यांची यादी देणें दुरापास्त आहे. तेव्हां त्या खटपटींत मी आतां पडत नाहीं.

## रामजोशीतात्या व अनंतफंदी.

पंतांनंतर नामांकित असे कवि रामजोशीतात्या व अनंतफंदी हे दोघे झाले. हे दोघेही प्रथमतः मोठे रंगेल व फंदी होते. तमाशे वगैरेंत चूर असत आणि यांच्या कृतींत शृंगारिक लावण्या बऱ्याच आहेत. परंतु पुढें यांस विरक्ती होऊन त्यांनीं लावणी, फटके वगैरे रंगेल वृत्तांतच वैराग्य, नीति यांचा रसपरिपोष करून आपली काव्यकर्तृत्वशक्ति त्या मार्गास लाविली. तात्या तर पुढें कीर्तन करावयास लागले, आणि अशी आख्यायिका आहे कीं मोरोपंतांची आर्या कीर्तनांत म्हणून दाखवून तिला जगांत प्रसिद्ध करण्याचें श्रेय प्रथमतः यांनींच घेतलें. यावरून पंतांनीं आपली सर्वच आर्या तात्यांस अर्पण केली. अशाबद्दल एक आर्या ऐकिवांत आहे. ती अशी,

> जैशी जनकें दिधली सच्चिद्घन राम जो सिता त्याला ।
> तैशी मयुरें दिधली स्वार्या ती रामजोसि तात्याला ॥

ही आख्यायिका खरी असल्यास रामजोशीतात्यांच्या कवित्वाबद्दल पंतांचे मनांत किती प्रेम व आदर असेल हें सहज दिसून येणार आहे. अनंतफंदीची कविताही फार प्रासादिक आहे. शृंगार काय, वैराग्य काय, भक्ति काय जो परिपोष करावयाचा असें या कविद्वयानें मनांत आणावें, तो त्यांस पूर्णपणें साधे.

येथपर्यंत इसवी सनाच्या बाराव्या शतकास प्रारंभ करून तों तहत इ. स. १८१९ पर्यंत म्हणजे पेशवाईचा अस्त होईपर्यंत जे मुख्य मुख्य कवि होऊन गेले, त्यांची कालक्रमानें नांवनिशी देऊन थोडक्यांत त्यांच्या मुख्य मुख्य ग्रंथांविषयीं

मला काय सांगावयाचें होतें, तें सांगितलें. फक्त याच काळांत व विशेषतः सतराव्या व अठराव्या शतकांत झालेल्या शाईरांच्या व गोंधळ्यांच्या पोंवाड्यांविषयीं काहीं सांगण्यांत आलें नाहीं. त्यांच्याविषयीं सामग्र्येंकरून मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, होनाजी बाळ वगैरे सारख्यांचे पोंवाडे आहेत ते कमी दर्जाचे आहेत असें समजूं नये. या कवींच्या पोंवाड्यांची भाषा कितीही अशुद्ध अशी आपणास वाटली तरी हींत एक प्रकारचा जो जोम आहे, तो मोठा विलक्षण आहे. सिंहगडच्या किंवा अफजुलखानावरच्या पोंवाड्यासारखा जोमदार पोंवाडा तसाच जोमानें म्हणणारा मिळाल्यास ऐकणाराच्या अंगांत वीरश्री उपजवून सर्वांग रोमांचित करील याबद्दल तिळमात्र शंका नाहीं. कित्येक पोवाडे रचणाऱ्यांना केवळ अंतःस्फूर्ति होऊनच त्यांचे मुखांतून शब्दप्रवाह बाहेर पडलेले आहेत. शालिग्रामानीं छापलेले पोंवाडे एकवार सर्वांनीं वाचावे अशी माझी प्रार्थना आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करूं इच्छिणाऱ्यांना उपयोगीं पडेल अशा तऱ्हेनें मराठी वाङ्मयाचा विचार झाला. आतां अन्य दृष्टीनें ज्यास थोडक्यांत या विषयाचें ज्ञान करून घेणें असेल त्याचेसाठीं वाङ्मयाचें अवलोकन करून शेवटीं ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, वामन व मोरोपंत या कविवरांच्या ग्रंथांत प्रत्येकीं विशेष काय आहे, तें कथन करून हा वाग्यज्ञ समाप्त करूं.

मराठी वाङ्मयाची परंपरा इतिहासदृष्टीनें—कालानुक्रमानें— आतांपर्यंत पाहिली. ज्यास या आमच्या अगदीं साध्या परंतु श्रुतिमनोहर व आपल्या सर्व विकारां–विचारांच्या छाया उपछाया अभिव्यक्त करण्याला सर्वथा क्षम, अशा मातृभाषेच्या उत्क्रमणाचा अभ्यास करावयाचा असेल त्यानें या दृष्टीनें अभ्यास केल्यास त्यास साधारणतः उपयोगीं पडेल असा मार्ग काढून दिला; परंतु सर्वांनाच अशा तऱ्हेनें अभ्यास करण्याची सवड असते असें नाहीं. पुष्कळांना ' सगळ्यांतलें थोडें थोडें ' मिळावें अशी इच्छा असते. आपण आतां अन्य दृष्टीनें विचार करूं.

मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, आमची कविता कथा उपकथांचें कथन करण्याच्या इच्छेपासून उपस्थित झाली नाहीं. मनुष्याच्या जिवास या संसारसमुद्रांत फार गोते बसतात व नेहमीं त्या समुद्राच्या तळीं आपण जाऊं असें भय वाटतें. त्याच्या पार तरून जाण्याचें सामर्थ्य आपले अंगीं नाहीं असें ज्यास त्यास वाटतें तेव्हां त्यांतून तारून नेण्यास एकच समर्थ जें परब्रह्म, जें

**एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ।**

अशा प्रकारें श्रुतींनीं वर्णिलें, त्याचें ज्ञान करून घ्यावें किंवा त्याची भक्ति करावी आणि त्या भक्तीनें त्यास आकळून हा भवसागर तरून जावा, ही ज्याच्या त्याच्या मनांत उद्भवणारी परमार्थाची इच्छा आमच्या मराठी वाङ्मयाचें मूळ.

मुकुंदराजाना किंवा ज्ञानेश्वरमहाराजाना कोणी कोणी आमच्या भाषेचे Chaucer म्हणतात. इंग्रजी भाषेतील आद्य कवि जसा चॉसर तसेच आमच्या भाषेतील आद्य कवि मुकुंदराज किंवा ज्ञानेश्वर असें विधान करण्यांत केवळ 'आद्य' या शब्दाचा अर्थच घ्यावयाचा असल्यास ठीक आहे. त्या त्या कवींच्या काव्यांतर्गत विचारांचें साम्य मुळींच नाहीं; इतकेंच नव्हे तर विषय परस्परांहून इतके भिन्न आहेत कीं, दोन ध्रुवसुद्धां एकमेकांहून इतके भिन्न नसतील ! आमच्या कविद्वयाचीं काव्यें मनुष्याला संसारांत वैराग्य उत्पन्न करून ब्रह्मज्ञान देण्याकरितां उत्पन्न झालीं. चॉसरादिकांचीं काव्यें त्या संसारांत रममाण होण्यास प्रवृत्त करणारीं काव्यें होत. तेव्हां तसें साम्य पाहण्याच्या हेतूनें दोघांची तुलना करण्याचें कोणीं मनांतच आणूं नये. आमच्या काव्यांचे साधारणतः स्थूल विभाग पाडले, तर १ वेदांतपर अथवा ब्रह्मपर, २ भक्तिपर अथवा सगुणोपासनापर, ३ महत्कथावर्णनपर व ४ विविधविषयपर.

## वेदांतपर.

ज्ञानेश्वरमहाराज, मुकुंदराज, एकनाथ, वामनपंडित व बरीच पद्यें करणारी कविमंडळी यांचे बहुतेक ग्रंथ वेदांतपर. अर्थात् या संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या मानवांस ब्रह्मज्ञान करून देऊन तरणोपाय दाखविण्याकरितां केलेले होत. वामन पंडितांनीं कांहीं कृष्णचरित्रपर व इतर विषयांवर कविता केल्या आहेत. त्यांच्या कित्येक कवितांत उत्तान शृंगारही आहे, परंतु सामग्र्येंकरून त्यांच्या ग्रंथांचें पर्यालोचन केल्यास त्यांत वेदांतपर व भक्तिपर कविता बरीच आहे असें दिसून येईल. राधाभुजंगासारख्या शृंगारप्रचुर काव्यांत सुद्धां वेदांताच्या छटा टाकून दिल्या असून असें काव्य लिहिण्यांतला आपला हेतु उदात्तच आहे असें म्हटलें आहे. यथार्थदीपिका, अपरोक्षानुभूति वगैरे काव्यें तर केवळ वेदांतपरच आहेत.

## भक्तिपर.

नामदेव, तुकाराम, रामदास, महिपती, व बहुतेक संत कवि हे भक्तिपर काव्यें रचणारे यांनीं परमेश्वर आपल्या भक्तीनें आकळावा या हेतूनें काव्यें लिहिलीं. एखादें संकटांत सांपडलेलें बालक आपल्या संरक्षणाकरितां आपल्या मातेला मोठ्यानें बाहूं लागतें, त्याप्रमाणेंच हे कवि आपल्या रसाळ व करुणार्द्र वाणीनें जगन्नियंत्या परमेश्वराला हांका मारितात व त्याचे गुण वर्णितात. तुकाराम व रामदास यांनीं मानवजातीच्या अनेकविध व्यंगांवरही कविता लिहून बोध केला आहे. व्यावहारिक विषयावर तुकाराममहाराजांचे किती तरी अभंग आहेत ! समर्थांनीं आपला दासबोध तर मुख्यतः त्याच प्रकारच्या बोधासाठीं लिहिला. तथापि या

कवींचा व पुष्कळ स्फुट पदें करणाऱ्या कवींचाही मुख्य कल भक्तीकडेच होय. महिपतीबोआंनीं तर सर्व भक्तमंडळींच्या लीला वर्णन करण्याकरितांच काव्यें लिहिलीं; तेव्हां अर्थातच साहाजिकपणें त्यांच्या त्या काव्यांतून भक्तिरसाचा मुख्यतः आविर्भाव झाला. तथापि त्यांच्या काव्यांस

## महत्कथापर

या सदराखालींही घालतां येईल. मुक्तेश्वर, मोरोपंत व रघुनाथ पंडित हे मुख्यतः आणि अंशतः एकनाथ व वामन हे या सदराखालीं येतात. वस्तुतः पाहतां आमच्या सर्वच कवींच्या बहुतेक ग्रंथांत–जोशीबुवा फंदी वगैरेंच्या शृंगारिक लावण्यांतही–मधून मधून वेदांतज्ञान व भक्तिरस यांचा परिपोष असतो. परंतु महाभारतादि ग्रंथांतील आख्यानें घेऊन या कवींनीं काव्यें लिहिलीं म्हणून यांस 'महत्कथापर' या सदराखालीं घातलें आहे. इंग्रजी राज्याची प्रतिष्ठा महाराष्ट्रांत होण्यापूर्वीं केवळ व्यावहारिक विषयावर काव्य लिहिणारे कवि पांच चार सुद्धां होऊन गेले नाहींत. ज्यांत भगवंताचें किंवा त्याच्या परम भक्तांचें नांव नाहीं, असें काव्य अठराशें अठरा इसवीच्यापूर्वीं झालेंच नाहीं. काय पांच पन्नास किंबहुना फार तर शें पांचशें लावण्या पोवाडे असतील तेवढेंच. तेव्हां ४ था वर्ग जो

## विविध विषयपर

काव्यांचा, त्यांत फार थोडे कवि येतात. अशी एकंदर आमच्या कवितेची वर्गवारीची कथा आहे. आमचीं सर्व 'लिरिक्स' वेदांत, भक्ति, किंवा व्यावहारिक नीति यांवर आहेत. कवीची दृष्टि जिकडे जाईल त्यावर अर्थपूर्ण असें काव्य तो करीलच करील. लिरिक या शब्दांत जो अर्थ भरला आहे, त्या अर्थानें 'लिरिक' म्हणण्याजोगी कविता आमच्यांत पुष्कळ आहे. परंतु त्यांतील विषय बहुतेक वर सांगितलेल्या विषयत्रयापैकींच आहे 'लिरिक' या इंग्रजी शब्दांत स्थूल मानानें दोन अर्थांचा समावेश होतो (१) जी कविता तंत्री किंवा वीणा घेऊन तिच्यावर गाण्यास योग्य ती व (२) जींत कवीचें स्वतःचें हृद्गत सुंदर शब्दांनीं उद्गारलें गेलें आहे ती, या दोनही लक्षणांनीं युक्त अशी कविता असली तर तिला इंग्रजींत 'लिरिक' असें म्हणतात. या लक्षणांनीं युक्त अशी कविता मराठी वाङ्मयांत किती तरी आहे असें मला वाटतें. इंग्रजींत ज्याला एपिक म्हणतात अशा प्रकारची स्वतंत्र कविता १९ व्या शतकाच्यापूर्वीच्या मराठींत नाहीं. आणि नाट्यकविताही नाहीं हें उघडच आहे. आणि तेवढ्यानें तें वाङ्मय बरेंच ओकें दिसतें हें खरें, तथापि त्या उणीवीमुळें तें अगदींच अग्राह्य असें मात्र मला वाटत नाहीं. त्याच्यावांचूनही तें ऐश्वर्ययुक्त आहे. या

माझ्या म्हणण्यावरून असें कोणी समजूं नये कीं ' एपिक ' कवितांचें किंवा नाटकांचें महत्त्व मला वाटत नाही. तें महत्त्व मला फार वाटतें. परंतु ती नसल्यामुळें आमच्या वाङ्मयास विलक्षण हीनता आली आहे, असें मात्र मला वाटत नाहीं. वाङ्मय किंवा कविता या दोन शब्दांत जो अर्थ भरला आहे; त्या अर्थाच्या दृष्टीनें मराठी भाषेंत वाङ्मय व कविता हीं पुष्कळ आहेत, एवढेंच माझें म्हणणें आहे. त्यांचा अभ्यास करण्याची उत्कट इच्छा मात्र आपणास पाहिजे व तो अभ्यास आस्थेनें केला पाहिजे.

तया प्रमेयाची वोढवण । वरी द्वीजे साहित्याचें वोल्हवण ॥
तरी कविता वशीकरण । कवणासि नव्हे ? ॥

याप्रमाणें साहित्यानें मनोवेधक केलेली प्रमेयांची मांडणी जींत आहे अशी कविता कोणाचें चित्त वश करून घेणार नाहीं ? ज्यांस नुसतीं प्रमेयेंच पहावयाची असतील, त्यांचेसाठीं ज्ञानेश्वरमहाराजांची ज्ञानेश्वरी व एकनाथांचें एकादशस्कंध व्याख्यान--ज्यास एकनाथी भागवत असें म्हणतात तें--तयार आहे. ज्यांस भक्तिमत्ता पाहिजे असेल, त्यांचेकरितां नामदेव, तुकाराम व रामदास यांनीं ग्रंथ निर्माण केले आहेत. ज्यांस विद्वत्व व कवित्व यांचें मिश्रण पहावयाचें असेल, त्यांनीं वामनपंडित व मोरोपंत यांचे ग्रंथ पहावे. रसपरिपाक, वर्णनसौंदर्य व भाषेची अव्याजमनोहरता ज्यांस हवी असेल त्यांचें मन रंजविण्यास मुक्तेश्वर तयार आहेत. केवळ शृंगार आणि वैराग्य यांचे मिश्रणाची ज्यांना आवड, त्यांचेकरितां रामजोशी तात्या व अनंतफंदी केव्हां मृदंगावर व केव्हां डफावर थाप मारून तयार आहेत. सारांश, कवितावधूचें ज्या वेषांत निरीक्षण करण्याची इच्छा असेल त्या त्या वेषांत ती सजलेली पाहण्यास मराठी भाषेंत सिद्धता आहे.

येथपर्यंत मराठी राज्याच्या ( पेशवाईसुद्धां ) अस्तापर्यंत, मराठी भाषेंत जें वाङ्मय अस्तित्वांत आलें त्याचें ऐतिहासिक दृष्ट्या व विषयदृष्ट्या विवेचन झालें. या दोन दृष्टींपैकीं कोणत्याही दृष्टीनें अभ्यास करणारास शुद्धानंदाचाच लाभ होईल. आतांपर्यंत एकंदर कवी सांगितले, त्यांत मुख्यतः सहा कवी फार मोठे. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, वामनपंडित व मोरोपंत. या प्रत्येक कवींत कांहींना कांहीं तरी विशेष आहे. या विशेषामुळें त्या प्रत्येकाची कविता वाचनीय झाली आहे. वेदांतासारखीं गहन प्रमेयें घेऊन तीं मराठी भाषेंत स्पष्ट समजावून देण्यास ज्ञानेश्वरांनीं जी दृष्टांत चमत्कृति दाखविली आहे तिच्या तोडीची चमत्कृति आमच्या भाषेंत तर नाहींच, परंतु इतर कोणत्या भाषेंत असल्याचेंही वाचनांत नाहीं. या दृष्टांतामुळें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ जरी केवळ टीकात्मक

आहे, त्यांत दुसऱ्या एका परम पूज्य संस्कृत ग्रंथावरलें व्याख्यान आहे, तरी त्यास स्वतंत्र काव्याची योग्यता आली आहे. एक एक प्रमेय वाचकांच्या मनावर ठसविण्यासाठीं जें दृष्टांतभांडार कवीनें ओतलें आहे, तें पाहिलें म्हणजे या कवीच्या प्रतिभेबद्दल अत्यंत आश्चर्य वाटतें. कित्येक वेळा तर असें वाटतें, कीं चंद्र-किरणांच्या प्रेरणेनें सागरांत ज्याप्रमाणें लाटांवर लाटा उचंबळत असतात, त्याप्रमाणें ज्ञानेश्वराच्या मनांत अंतःस्फूर्तीच्या योगानें दृष्टांतावर दृष्टांत वर उसळून येऊन शब्दांच्या रूपानें बाहेर पडत आहेत, आणि पुनः ते दृष्टांत असे सहज व साधे दिसतात, कीं त्याकरितां ज्ञानेश्वरांस कांहीं श्रम पडले असतील असें वाटतच नाहीं. त्यांनींच म्हटलें आहे.

**पाहें पां पूर्ण चंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी ।**
**तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥**

असे त्या चंद्रास त्या कामीं कोणतेही श्रम पडत नाहींत, त्याचप्रमाणें ज्ञाने-श्वरांच्या बुद्धीस दृष्टांतामुळें कांहीं श्रम पडलेले दिसत नाहींत. ज्ञानेश्वरमहाराजांचें सर्व काव्यैश्वर्य या दृष्टांतांतून भरलें आहे. त्यांचीं प्रमेयें कदाचित् भिन्न मतवाद्यांस आवडणार नाहींत, परंतु दृष्टांत वाचून त्यांच्या कवित्वाबद्दल प्रत्येक सहृदय वाचक मान डोलविल्याखेरिज राहणारच नाहीं.

तुकारामबोआंच्या कवितेंत प्रेमळपणा फार. त्यांची भाषा अत्यंत साधी, स्वतःच्या अंतःकरणाला जें वाटेल तें व जो अनुभव येईल तो तत्काल कवितेच्या रूपानें त्यांचे मुखांतून पडला असला पाहिजे तुकारामबोआंच्या वेळीं त्यांच्या अनुयायांत पहिल्यापासून त्यांचे संनिध राहिलेल्या कोणी गृहस्थानें जर मनांत आणलें असतें कीं महाराजांच्या तोंडून निघालेल्या अभंगाची उपज होण्याला तात्कालिक कारण काय झालें तें शोध करून टिपावयाचें, तर माझी खात्री आहे कीं महाराजांच्या चार पांच हजार अभंगांपैकीं दोन अडीच हजार अभंग तरी कांहीं तरी प्रसंगानें त्यांस एकदम स्फूर्ति होऊन त्यांचे तोंडून बाहेर पडले होते, अशी माहिती त्यांच्या टिपणांत सांपडली असती. पाटी पेन्सिल घेऊन खोलींत कोंडून घेऊन डोकें घोळघोळून बनविलेली त्यांची कविता नव्हे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत नानाप्रकारचे प्रसंग दृष्टीस पडले, कीं लागलीच यांची वाणी सुरू होऊन अभंगावर अभंग बाहेर पडत असावेत. कीर्तनसमयीं जो उपदेश निघावयाचा, जो विषय विवेचनास घ्यावयाचा, त्याला समर्थन कर-णारे अभंग तत्काल मुखांतून निघावयाचे असें वाटण्याइतकी सहजता, अव्याज-मनोहरता व विपुलता त्यांच्या कवित्वांत आहे. ज्ञानेश्वरांनीं आपणास गीतेस बांधून तरी घेतलें होतें, परंतु तुकारामबोआंस तसाही कांहीं निर्बंध नव्हता. त्यांची कविता

स्वयमुद्भूत–तिच्यांतील मधुरिमा झाडावर पिकून आपोआप स्फुटित झालेल्या आम्रफलाप्रमाणें होय. अर्धकच्चा झाल्याबरोबर तोडून आणून गवतांत घालून उबवून पिकविलेल्या आंब्याची गोडी त्यांच्या कवितेंत नव्हे नामदेवांनीं पांडुरंगासमेत स्वप्नांत येऊन तुकारामबोआंस जागें करून

**सांगितलें काम, करावें कवित्व ।**
**वाउगें निमित्य बोलों नको ॥**

यावर कोणाचा भरंवसा बसो वा न बसो, पण तुकाराममहाराजांस कवित्वाची सहजस्फूर्ति खास. त्यांनींच एका अभंगांत म्हटल्याप्रमाणें त्यांची वाणी " **आधारें वदली प्रसादाची वाणी** " च खचित. त्यांचे बोलण्यांत, उपदेशांत, दृष्टांतांत कोठेंही भित्रेपणा नाहीं. जें ज्या प्रसंगीं बोलावयाचें तें अगदीं निस्पृहपणें बोलावयाचें, त्यांत अलंकारिकपणानें सौम्यपणा आणण्याचा प्रयत्नच नाहीं. त्यांच्या कवितेस उसनें सौंदर्य नाहीं. ती वनश्रीप्रमाणें सुंदर, प्रतिभारूप, मेघोदकानें वाढलेली; ती कृत्रिम यंत्रानें सिंचित केलेल्या कूपोदकानें परिपोषित अशी उपवनश्री नव्हे. ज्ञानेश्वरांनीं जीवशिवांचें ऐक्य आहे हें ज्ञान वाचकांस करून देऊन परमानंदप्राप्ति करून द्यावी या हेतूनें कवित्व केलें. परंतु तुकाराममहाराजांनीं मुख्यत: परमेश्वरभक्तींत सगळा काहीं आनंद आहे हें शिकविलें.

**मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड ।**
**तो असे उघड गांठोळीसी ।**
**भक्तीचे सोहाळे होतील जीवासी ।**
**नवल तेविशीं पुरवितां ॥**

हें त्यांचें मागणें, दुसरें एका अभंगांत तर स्पष्ट म्हटलें आहे:—

**सरलिया भोग येईन शेवटीं ।**
**पायापे या भेटीं अनुसंधानें ॥**
**आतां मजसाठीं याल आकारास ?**
**रोकडी हे आस नाहीं देवा ॥**
**तुका म्हणे मुखीं असो तुझें नाम ।**
**देईल तो श्रम देवो काळ ॥**

रामदासस्वामींनीं मात्र आपल्या कवितेंत स्वार्थ आणि परमार्थ यांची सांगड घालून दिली आहे. जो संसारांत असेल, त्यानें त्यांतच राहून स्वार्थ व परमार्थ कसे साधावे हें सामान्य जनांस समजावून देण्यास त्यांच्या कवित्वाचा अवतार झाला असें म्हणण्यास दासबोधांत अनेक कारणें आहेत. प्रोफेसर शेर्प

यांनीं कवितेवरील आपल्या एका व्याख्यानांत म्हटलें आहे, What man is what he does, what he should do, what he may become, what he may enjoy, admire, venerate, love, what he may hope, what is his ultimate destiny,— these things are never absent from the thoughts of great poets, and that not by accident; but from their very essence as poets. या म्हणण्याची सत्यता महाराष्ट्रांतील बहुतेक कवीश्वरांच्या कवितांवरून चांगली दृष्टीस पडते, परंतु रामदासस्वामींच्या ग्रंथांत ती विशेष तऱ्हेनेंच निदर्शनास येते. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अज्ञ जनांस परमार्थाच्यासंबंधानें ज्ञान करून देण्यासाठीं कविता लिहिली. तुकाराममहाराजांनीं परमेश्वर भक्ति हाच एक केवळ पुरुषार्थ, दुसरा कोणताही पुरुषार्थ नव्हे, असें शिकविलें. परंतु रामदासांनीं आपल्या काळची परिस्थिति पाहून त्या वेळच्या जनांस उपदेश केला. " मनुष्य कोण आहे, काय करतो, त्यानें काय करावें, काय व्हावें, कशाचा उपभोग घ्यावा, कशाविषयीं प्रेमादर बाळगावा, कशावर भक्ति ठेवावी, कशावर प्रेम करावें, कशाची आशा धरावी, व त्याची अंतिम स्थिति काय होणार "— या सर्व गोष्टी समर्थांच्या चित्तांत सदैव वागत होत्या आणि त्यामुळें त्यांच्या अमोल बोधग्रंथांतून कोणत्याही गोष्टी वगळल्या गेल्या नाहींत. त्यांची भाषा निसर्गसुंदर, बोध फार सुगम व व्यवहाराला धरून आणि रसपूर्ण. दासबोध केव्हांही वाचला असतां त्यांतून तत्काळ उपयोगी असा बोध मनुष्याच्या मनांत उतरतो. समर्थ ज्या वेळीं झाले, त्या वेळीं झाले नसते, तर मराठ्यांचा इतिहास इतका वर्णनीय होण्याला एक मोठेंच कारण कमी झालें असतें.

ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास ही त्रयी म्हणजे स्वयंस्फुरित कविताशक्तीची अवतारत्रयीच होय. या त्रयीनें मराठी वाङ्मयास जगाच्या वाङ्मयाच्या इतिहासांत बरेंच वरचें स्थान मिळेल अशी योग्यता आणून दिली. मुक्तेश्वर, वामन पंडित व मोरोपंत हे यांच्या मानानें दुसऱ्या प्रतींत येतात. परंतु त्यांची कविताही फार सुंदर व आल्हाद देणारी होय. मुक्तेश्वरांचें महाभारत वाचतांना त्यांच्या वर्णनशैलीमुळें ते ते देखावे व त्या त्या व्यक्ति आपल्या डोळ्यांपुढें दिसत आहेत असेंच वाटतें. त्यांच्या भाषेंत कृत्रिमता बिलकुल नाहीं. त्यांच्या उपमा अगदीं सहज. निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो, तो आनंद मुक्तेश्वराच्या काव्यापासून होतो. तसा शुद्धानंद पंडितांच्या किंवा पंतांच्या काव्यापासून होत नाहीं. पंडित व पंत हे कवि नव्हते, किंवा त्यांच्या काव्यांतून कवितेचा परिपोष नाहीं, असें माझें म्हणणें नाहीं. आपला गैरसमज होऊं देऊं नका. माझें म्हणणें एवढेंच कीं, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास व अंशतः मुक्तेश्वरही यांच्या अंतःकरणांत

कविप्रतिभेचे कल्लोळ आपोआप उठून, जणूं काय त्यांनीं नको नको म्हणून दाबून ठेवण्याचा प्रयत्न केला तरी न दबतां, तें शब्दरूपानें भराभर बाहेर पडत, असें त्यांची कविता वाचूं लागल्याबरोबर वाटतें. आणि पंडित व पंत यांची कविता वाचतांना तसें वाटत नाहीं. पहिल्या चतुष्टयाच्या काव्यांचें वाचन करीत असतां जो आनंद होतो, तो आकाशांतून पडणाऱ्या पर्जन्योदकाच्या वर्षावानें होणाऱ्या आनंदाप्रमाणें असतो. मेघोदरांतून वृष्टिरूपानें आलेल्या जलाची आणि तेंच पर्जन्योदक तळ्यांत धरून ठेविलें असल्यास त्याची गोडी व तेजी हीं सारखीं कशीं असणार ! दोन्ही पर्जन्योदकें खरीं, परंतु एक मेघोदरांत नाहींसें होऊन तेथून बाहेर पडून पृथ्वी भिजविण्याकरितां खालीं येऊन आपल्या तेजानें व माधुर्यानें सर्वास आल्हाद देतें. आणि दुसरें सांचून सांचून लोकांच्या उपयोगास पडल्यामुळें आनंददायक वाटत. एकाच्या वर्षावाबरोबरच आल्हाद; दुसऱ्याचा परीक्षा वगैरे होऊन तें चांगलें ठरलें तर आल्हाद ! हीच स्थिति स्वयमुद्भूत काव्यें व कृत्रिम काव्यें यांमधील विरोधदर्शक तुलना केली असतां दिसून येते. वामन पंडित हे मुख्यतः पंडित. त्यांचा विशेष प्रतिभा नव्हे, तर पांडित्य होय. पांडित्याबरोबर पुष्कळ वेळां येणारा अहंपणा त्यांचे अंगीं एकवार पुष्कळ असून तो कारणपरत्वें नष्ट झाला. परंतु यथार्थदीपिकादि ग्रंथ पाहिले म्हणजे तो अगदीं निःशेष नष्ट झाला होता असें वाटत नाहीं. आपल्या टीकेस यथार्थदीपिका हें नांव दिलें. यांतच भावार्थ दीपिकेला एक प्रकारें तोंड देण्याचा हेतु दिसतो. त्यांची टीका त्यांच्या पांडित्य-प्रकर्षामुळें वाचनीय—निर्व्याजमनोहर म्हणून वाचनीय नव्हे.

मी म्हणतों याला प्रत्यय पहावयाचा असल्यास ज्ञानेश्वरांच्या भावार्थ दीपिकेंतील व पंडितांच्या यथार्थदीपिकेंतील ९ वा किंवा १३ वा हे अध्याय बरोबर वाचून तुलना करून पहावी.

पंतांच्या काव्याबद्दल माझा किती आदर आहे हें मीं वर सांगितलें आहे. त्यांचीं काव्यें आनंदकर आहेत, विविध रसांचीं पोषक आहेत. परंतु चित्रकाव्य जेथें साधेल, तेथें तें साधण्याकरितां रसहानि होते कीं काय, इकडे लक्ष न दिल्याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांतून किती तरी सांपडतील. पुनः मी आपणास सांगतों, कीं आपला गैरसमज होऊं देऊं नका. मोरोपंत कवि नव्हते किंवा त्यांच्या ग्रंथांत काव्य नाहीं असें माझें म्हणणें नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं त्यांच्या काव्यांत व वामन पंडितांच्या काव्यांत कृत्रिमता विशेष. पंतांनीं आपल्या बसण्याच्या खोलीभर यमकें लिहून ठेविलीं होतीं व त्यांचा ते लागेल तसा उपयोग करीत. ही आख्या-यिका आपण ऐकलीच असेल, यमकांचा त्यांनीं अभ्यास केल्याकारणानें तीं त्यांस पुढें अगदीं सहज होऊन गेलीं; परंतु त्यांचा भर यमकांवर व शब्दचमत्कारावरच

फार. मुक्तेश्वरांचा भर शब्दचमत्कृतीवर मुळींच नाहीं, अर्थावर फार. यामुळें त्यांचीं महाभारतांतील आख्यानें पंतांच्या आख्यानापेक्षां सहृदय वाचकांस अधिक आल्हादकारक होतात.

असो. आतां या कविषट्कास मी मोठ्या आदरानें प्रणाम करून व आपणांस

**तऱ्ही पुरोहितपणें । मी बोलिलों पुरें उणें ।**
**तें तुम्ही माउलीपणें । उपासाहिजो जी ॥**

अशी विनंत करून, आपल्या आज्ञेवरून स्वीकारलेल्या पौरोहित्यास अनुसरून ह्या आपल्या वाग्यज्ञाची परिसमाप्ति करतों. कोणत्याही यज्ञाची सांगता आशीर्वाद-ग्रहणाखेरीज होत नाहीं, एवढ्याकरितां ज्ञानेश्वरमहाराजांच्याच शब्दांनीं आशी-र्वचनही करतों.

**आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ॥**
**तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥**
**दुरिताचें तिमिर जावो । विश्वस्वधर्मसूर्यें पाहो ॥**
**जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥**

